# संगीत उ:शाप

© श्रीमती हिमानी सावरकर

सावरकर भवन, राजा ठाकूर पथ, शनिवार पेठ, पुणे.

दूरध्वनी :+९१२०२५५४४७५१

इंटरनेट अधिकार :- स्वा. सावरकर राष्ट्रीय स्मारक

स्वा. सावरकर मार्ग, दादर, मुंबई ४०००२८.

## प्रकल्प संचालक : रणजित विक्रम सावरकर

प्रकल्प समन्वयक : अशोक रामचंद्र शिंदे

हे पुस्तक आसामी, बंगाली, इंग्रजी, गुजराथी, हिंदी, कन्नड, मल्याळम, मराठी, ओडिया, पंजाबी, तमिळ, तेलुगु या भाषांमध्ये उपलब्ध आहे.

# संगीत उःशाप

अंक १ ला

प्रवेश १ ला

(सूत्रधार, नटी, पारिपार्श्वक उभे आहेत.)

नांदी : पद.

देइ उःशाप हा, हिंदु जातिसी पहा ।।

हे पतितपावना, अमित अपराध, परि स्मर कुल-गुरु-तप महा ।। ध्रु.।।

पय यशोदे तुझे , पयहि यमुने तुझे , स्वकुल लोभ स्मरवुत, रिझवुत यदुप हरि हा ।। १

पद २ रे

आजवरि आचरि जो चरिताला ।। ध्रु.।।

नाट्यविषय जे अद्भुत व्हावे । अन्य सु-कविजनाला ।। १ ।।

अन्य चरित्रा नाट्यी रचिता । आजि विनायक झाला ।। २ ।।

सत्यप्रिय : (पडद्यातून) थांबा! थांबा!

सूत्रधार : अरे, मंगलाचरण संपत न संपत तोच आम्हाला, थांबा, थांबा म्हणून आज्ञा सोडीत हा इकडे कोण येत आहे?

नटी : नाथ! विनायकाच नाव ऐकताच हा कुणी तरी अधिकारी नाटक बंद करण्याकरिता इकडे येतो आहे की काय, असा मला धाक वाटतो. ही नाट्यकृति विनायकाची आहे, असे आपण कशाला बरे सांगितलंत? आक्षेपाच्या प्रबल शापाचे वज्राघाताखाली विनायकाच्या लेखणीची देवकीच्या देववंद्य कुसव्यासारखी करुणास्पद स्थिति झालेली आहे. देवकीची दैदीप्यमान अपत्य, जशी उपजताच मृत्यूच्या जबड्याचे

थडग्यात पुरून टाकिली जात, तशीच त्या लेखणीच्या अपत्यांची स्थिति आजवर झाली असून, योगायोग एखाद्या काळ पुरुषाप्रमाणे त्यांस उपजताच विस्मृतीच्या अतल पातालात ढकलून देत आलेला आहे.

सत्यप्रिय : (पडद्यातून) थांबा! थांबा!

पारिपार्श्वक : अरे बापरे! सरकारी अधिकारीच हा! आता कुठे जाऊ? अरे सूत्रधारा! अनुभवी, सुप्रतिष्ठित आणि प्रतिभावान् असे इतर नाट्याचार्य सोडून, या नवशिक्या नाटककाराशी गाठ घालण्याची ही आत्मघातकी दुर्बुद्धि तुला आठवली तरी कशी? अहो सूत्रधार! आपल्या हातातील हे नाटकाच सूत्रच नव्हे तर या आपल्या नटव्या अर्धांगीच्या गळ्यातले हे मंगलसूत्रही आज सत्ताधिकाऱ्यांच्या त्या क्रुद्ध कात्रीत गवसले आहे.

सूत्रधार : घाबरू नकोस! माझे मंगलाचरण म्हणजे सर्व शापांचा मूर्तिमंत उ:शाप आहे. त्या उ:शापाच्या मंगलाचरणान संतुष्ट होऊन तो दयामय भगवान्, पूर्वी एकदा विनायकाच्या लेखणीवर झालेल्या शापाला अगस्तिमंत्राला दीन करून टाकिलेल्या सापाप्रमाणे निरुपद्रवी करून टाकील.

सत्यप्रिय : (पडद्यात) थांबा! थांबा! (प्रवेश करून) कोण हो? गृहस्थांनो! तुम्हीच का नाटक करायला सिद्ध झाला आहात?

पार्श्वचर : नव्हे, नव्हे, मी नव्हे. हा आणि ही. मी केवळ निरीक्षक म्हणून येत होतो.

सत्यप्रिय : निरीक्षक म्हणून? नाटक करणे जर अपराध असेल, तर ते आवडीन पाहणे म्हणजे अपराधाला प्रोत्साहन देणे नव्हे का?

पार्श्वचर : सरकार! मी पाया पडतो. मी जातो. सरकारी अधिकाऱ्यांचा सन्मान करण्यासाठी मी त्यांच्यापुढे नेहमीच थरथर कापत असतो.

सत्यप्रिय : परंतु मी सरकारही नाही किंवा सरकारी अधिकारीही नाही. किंवा त्या लोकोपयुक्त संस्थेशी तत्वतः माझे वैरहि नाही. तेव्हा आपण मला भिऊ नका.

पार्श्वचर : (उठून) सरकारी अधिकारी नाहीस ना? तर मग तू कोणीही ऐस. प्रत्यक्ष देव का असेनास, तुला मी भीत नाही. भलत्या सलत्याला भिण्याइतका मी काही भेकड नाही, समजलास? बोल. तू काय म्हणून आमच्या रंगाचा बेरंग केलास?

सूत्रधार : (पार्श्वचरास दाबीत) अहो! मी या नाटकाचा सूत्रधार आहे. आपणही या माझ्या नाट्यप्रयोगाला अवलोकन करून उपकृत कराल का? मला आपले नामाभिधान कळेल का?

सत्यप्रिय : माझे नाव सत्यप्रिय. पूर्वी चोखामेळ्याचे काळात सत्यवान् म्हणून एक प्रख्यात धर्मप्रवर्तक होऊन गेले, त्यांच्या पंथाचा मी अनुयायी आहे. त्या आमच्या गुरूंनी सत्य हाच धर्म होय! असा सिद्धान्त स्थापित केला. सत्य हाच आमचा वेद. एतदर्थ आमच्या पंथाला सत्यवेदी असे संबोधितात. लोक उपहासाने आम्हाला सत्वेडे असेही म्हणतात.

सूत्रधार : वा! तर मग आमच्या नाट्यप्रयोगाला आपल्यासारखा सत्यप्रिय निरीक्षक लाभावा, हे भाग्यच म्हणायचे. आपले गुरू सत्यवान्, संत चोखामेळा ह्यांच्या समकालीन असल्याने त्या संतांच्याच कथानकाला अभिनीत करण्यासाठी मुख्यतः रचल्या गेलेल्या ह्या नाटकात आपणांस आपले गुरू सत्यवान् ह्यांच्याही दर्शनाचा लाभ होणार आहे.

सत्यप्रिय : भलतेच! अहो! मद्यपानाची चटक लावण्यास जशी विपत्ति वा आपत्ति, विषयाची चटक लावायला जशी सुंदरता, संसाराची चटक लावायला जशी माया, तशीच लोकांना असत्याची चटक लावायला ही नाट्यकला कारण झालेली आहे. मी तिचे निरीक्षण करायला नव्हे; तर, तिचे निर्दालन करायला आलो आहे.

सूत्रधार : पण हे काही राजकीय वा शृंगारिक नाटक नाही. संतविषयक नाटक देखील सत्याच्या जीवनाला कशी घातक होतात हे आपणांसच ठाऊक!

सत्यप्रिय : नाट्यविषयक कथानक राजकीय आहे किंवा नाही, यावर नाटकाची घातकता अवलंबून नाही. कथानक नव्हे; तर, नाट्यकलाच वेश्येसारखी स्वरूपतःच असत्याची खाणे आहे. आपले मूळे स्वरूप झाकून, आपण दुसरे कोणी तरी आहो असे भासविण्याचा आटोकाट प्रयत्न करणे, म्हणजे केवळ ठकबाजी नव्हे का? त्यांतही नुसत स्वरूपांतरच नव्हे, तर लिगांतरही झाले असल्याचे भासवायचे! भासवायचेच नव्हे! तर आपण तीच व्यक्ति आहोत म्हणून शपथेवर सांगायचे आणि ती व्यक्ति होऊन रहायचे! कारण उत्तम नट तोच की जो आपल्या भूमिकेशी त्या काळपावेतो तादात्म्य करू शकेल. स्वतःस पूर्णपणे विसरून जाईल - जिवंतपणे दहादा इतके ठार मरून दाखवायचे की प्रेक्षकांना रडू कोसळावे. दिवसा पुरुष आणि रात्री स्त्री, इतके यथातथ्य होऊन दाखवायचे की भूमिकाधारी खरोखर पुरुष आहे की स्त्री, हे हजारो जणांना निश्चितपणे त्या व्यक्तीच्या जन्मभर सांगता येऊ नये. भर काळोख्या रात्री शपथेवर सांगायचे की भर उन्हात माझे पाय पोळत आहेत. आणि एखाद बोट खुपसल्यासही फाटून जाईल अशा पडद्याला

एक अभेद्य किल्ला समजून, त्यावर तोफा डागण्याला आज्ञा द्यायची. ह्या अत्यंत गर्हणीय असत्याचरणाची लोकांना लाज तरी कशी वाटते नाही। माझ्या हाती जर सत्ता असती तर मी त्या सर्व नटांना कडक शिक्षाचे दिली असती.

पार्श्वचर : (स्वगत) पुनः शिक्षा! मला अजून वाटते की छद्मवेश धारण केलेला कोणी अधिकारीच असावा. म्हणून त्याच्याही वतीचे दोन शब्द बोलून टाकावे. वेळच पडली तर याच दोन शब्दी बोलाच्या अरुंद बोळातून पळवाट काढून यःपलाय करायला सोपे जाईल. (उघड) अहो सत्यप्रिय, तुम्ही शिक्षेचे नाव काढण्याच्या आधीच मी तुम्हाला सांगणार होतो; की, मला तुमच्या बोलण्यात बरंच तथ्य दिसत आहे. अहो, खड्याच्र्या लढाईची गोष्ट घ्या. खड्याच्र्या लढाईत औरंगजेबाच्या हस्ते सदाशिवराव भाऊ मारले गेले, हे इतिहासज्ञांना विदित आहेच. त्या सदाशिवराव भाऊंच्या मृत्यूनंतर मीच तो सदाशिवराव भाऊ म्हणून म्हणणारा एक तोतया निघाला. त्याला ती असत्य भूमिका घेण्याच्या अपराधासाठी उंटावर उलटा बांधून मेखसून डोक फोडून की हो मारले! सत्ययुगात असत्याची इतकी चाड होती, पण आता आले कलियुग! आता पहा! आपण सदाशिवरावभाऊ आहोत म्हणून छातीवर हात मारून सांगणारे, पांच दहा तरी तोतये या महाराष्ट्रात आज रंगभूमीवर मिरवत असतात. पानपतचा मुकाबला! पानपतचा मोबदला! टीचभर रंगमंचावर तिने लाख सेनेच्या हालचाली करवीत पानपतच्या लढाया लढत असतात. पण त्यांचे डोक मेखसून फोडण दूरच! पण उलट चार चार रुपयांची तिकिटे काढून लोक टाळ्यांनी त्यांना सत्कारीत असतात. पेशवाई बुडाली म्हणून बरे झाले, नाही तर, या भाऊच्या तोतयांतील अत्यंत धाडशी, तो शाहूनगरवासी गणपतराव जोशी पेशव्यांच्या गादीवर आपला अधिकार सांगून, पुण्यावर स्वारी देखील करता. आणि हे प्रेक्षक आपल्या हातातील छड्यांसच तलवारी समजून 'हर हर महादेव' करून त्याच्या सैन्यांत भरती होते.

सूत्रधार : सत्यप्रिय! वाचिक सत्य म्हणजे सत्य ही तुमची सत्याची व्याख्या मला संशयास्पद वाटते. समाजाला मंगलास्पद असणाऱ्या ध्येयाकडे प्रवृत्त करायाला नाट्यकला- जर ती उदात्ताशी समरस होईल तर - एक अत्यंत उपयुक्त साधन आहे, असे मला अजूनही वाटते म्हणून तुम्ही मला क्षमा करा.

सत्यप्रिय : कसली क्षमा! अहो सूत्रधार! तुमच्या नांवापासून सगळी थापेबाजी! काय म्हणे सूत्रधार! अहो तुमच्या हातात सूत तरी धरीत जा तेवढा वेळ, म्हणजे तेवढे असत्याचरण टाळता येईल. तुम्ही बळाने काय वाटेल ते करा. पण मी तरी तुम्हाला सत्याच्या नांवाने नाटकाचा परवाना देत नाही.

पार्श्वचर : आम्हाला सरकारी परवाना मिळाला आहे. आता आम्ही सत्याच्या परवान्याला मुळीच भीक घालीत नाही, समजलांत!

नटी : पण प्राणनाथ, अभिनेय कथानकाचा प्रयोग करण्यासाठी सज्ज होऊन त्या पहा आल्याचे मुली. मायापूर गावच्या महारवाड्यात त्यांनी स्वतः लाविलेल्या फुलवाडीत फुले तोडायला येत आहेत, पहा! तर चला, त्यांचे रंगसाहित्य आपणांला तत्परतेने केलेच पाहिजे. तर चला. (जातात.)

प्रवेश २ रा

(स्थळ - मायापूर महारवाडा, पात्रे चंपी, सखू बोलत येतात.)

सखू : चंपे! खरच, ही या कमलिनीची फुलवाडी कशी आता एखाद्या नंदनवनासारखी शोभू लागली आहे, नाही? जेव्हा मोगरीला किंवा या प्राजक्ताला बहर येतो, तेव्हा या आपल्या सर्व महारवाड्यात सुगंधाचा दरवळ अगदी मावेनासा होतो. या फुलवाडीच्या मध्यभागी आपले महारांचे नाईक, जानबा महार यांनी त्यांच्या दोन मुलांसाठी - आपल्या किसन आणि कमलिनी, यांच्यासाठी - जे तुळशी वृंदावन बांधले आहे, तिथे तर या सुगंधाच्या दरवळाच्या मांडवाखाली क्षणभर जरी उभे राहिल तरी मन त्या देवीच्या देवळापाशी नवरात्रांत उभे राहिल्यासारखे प्रसन्न होते, नाही? देवळाच्या गाभाऱ्यात असच प्रसन्न पावित्र्य नांदत असेल, नाही?

चंपा : ते मला तरी कसे सांगता येणार? आपण महाराच्या मुली! देवीच्या देवळाच्या तटापर्यंत फारतर लोक आम्हाला जाऊ देणार. तेव्हा त्या देवीच्या देवळाच्या गाभाऱ्यातल प्रसन्न गांभीर्य कसे असते, याची कल्पना तरी आम्हाला कशी करता येणार? पण इतके खरे की, आपल्या जानबा नाइकांना संत चोखामेळ्याचा प्रसाद झाल्यापासून त्यांनी आपल्या या महारवाड्यात स्वच्छतेच्या आणि देवलसीपणाच्या अमृताचे सडे सकाळ-संध्याकाळ शिंपून शिंपून, त्यांनी महारवाड्याला इतके शुचिर्भूत, शोभिवंत आणि मनोरम करून सोडले आहे की, देवळातल्या गाभाऱ्यात मन कसे प्रसन्न होते असेल, याची थोडी तरी कल्पना आपणांला या तुळशीवृंदावनापाशीही उभे राहून करिता यावी. कमलिनी तर जानबाची मुलगीच. त्यांचा एकुलता एक मुलगा किसन आणि ही मुलगी कमलिनी! दोघांना ग्रंथ वाचायला, अभंग म्हणायला सर्व त्यांनी स्वतः शिकवले. त्यांच्याच संगतिने आपण सगळ्याजणी पण पोथी वाचू लागलो नाही का ग? कमलिनीला तर काय विचाराव, जानबांनी घासून पुसून एखाद्या देवीसारखी उज्ज्वल करून ठेविली आहे. ही फुलवाडी, हे वृंदावन आणि त्यांची ही मनोहर प्रसन्नता म्हणजे, कमलिनीच्या शोभेची आणि भक्तीची खाली पडलेली एक छायाच आहे.

सखू : मला किनई, पहिल्या पहिल्याने तिच्या सांगण्याचा कंटाळा येई. नेहमी स्वच्छ रहा! अंग धू! लावे हे झाड! कर पाठ तो संस्कृत शब्द! वाच ही पोथी! असे तिला सारखे म्हणाव. मी म्हणे, अग, आपण

महाराच्या मुली, आपण किती धुतल आणि पुसल, तरी ब्राह्मणांच्या मुली का शोभणार आहोत? तिने म्हणाव, अग, हा प्रश्न शोभेचा नाही. आपणांला नायकिणी थोडेच व्हायचे आहे. आपण शोभाव कसे हा प्रश्न नसून, आपण राहाव कसे, व्हावे कसे, हा प्रश्न आहे. आता मला कोणी, नको नको म्हटले तरी, शेतीभातीच आणि नगरातन मार्ग साफ झाडून येण्याचे काम संपताच, अंग धुऊन पोथीच्या चार तरी ओळी वाचल्याविना जिवाला समाधान वाटतेच नाही!

चंपा : जानुबाबांनी जेव्हा म्हटले की, प्रत्येक महाराच्या अंगणात एकेक वृंदावन पाहिजे, तेव्हा मी स्वतः माती खणून ते आपल्या दारासमोर बांधल. या फुलवाडीला असे गोकुळासारखे मनोरम बनवायला कमलिनीला मी शक्य ते साह्य देत आले बरे का?

सखू : हो तर! आणि आता या गोकुळाला, त्या गोकुळाची अगदी सर्वांशी समान प्रतिमा करण्यासाठी, कमलिनी या फुलवाडीत गोपींच्या लीलाही सुरू करणार आहे हो लवकरच! त्यालाही आपण साह्य द्या बरे, चंपाताई? खरच चंपे! तुला कळली का एक गंमत?

चंपा : काय ग ती?

सखू : अग, कमलिनीच त्या शंकरशी जमल आहे.

चंपा : जमल, म्हणजे ग काय?

सखू : काय हो ही भोळी पोर! कळत नाही का ग तुला? अग, जमल म्हणजे ह- नाही तसे नाही कळायचे तुला, अग, जसे तुझे त्या कमळीच्या भावाशी - किसनशी - जमल ना. तसेच कमळीच शंकराशी जमल हो. आता कसे कळले? छडी लागे छम् छम् विद्या येई घम् घम्-

चंपा : सखे, जर तुझ्या त्या जिभेची छडी अशीच निष्कारण लागते राहील तर तुझ्या संगतीची ही फटकळे शाळा सोडून लवकरच पळून जावे लागेल हो. जा, तू माझ्यापाशी उभी राहू नकोस. मी तिकडची फुले तोडते आपली!

सखू : मी पण तिकडची तोडते.

चंपा : तर मी इकडची तोडीन आपली.

सखू : अग पण माझ्यावर रागवायला काय झाले? मी का तुझे किसनशी जमवले? तुझेच आईबाप तसे कायस ठरवताहेत नाही का? त्यांच्यावर रागाव आपली.

चंपा : सखे, खरेच का? काय ग, पण कमळीला तिचे वडील शंकराला देणार?

सखू : वडील काय म्हणतात, ते काही मला माहीत नाही. पण कमळीच्या भावान- तुमच्या भावी यजमानांनी- काल शंकरला तसे त्या फुलवाडीत सांगताना मी ऐकले आपले उडत. शंकरचा आणि किसनचा लहानपणापासूनचा स्नेह, ह्या नव्या बंधनाने अधिकच स्निग्ध होणार. आणि तुम्ही तर काय- कमलाबाई- तुमच्या वन्स होणार नाही का आता?

चंपा : ते तू काय वाटेल ते म्हण. पण मी आपली कमलिनीला आणि तुला लहानपणच्या प्रेमळे मैत्रिणी म्हणूनच ओळखणार.

सखू : अग! आलीच ती कमली! गंमत करू हो तिची जरा (कमलिनी प्रवेश करिते) कमळे! ही पाहिलीस का मोगरीची मी किती फुले तोडली ती? चंपाची परडी मात्र रिकामीच्या रिकामी- नुसती गप्पा मारीत होती.

चंपा : नाही ग, कमलिनी, ती फुले तोडीत होती; तेव्हा मी ह्या मोगरीला मदनबाणाला पाणी घालीत होते, त्यांची आळी साफ करून त्यांच्या पानाला लागलेली कीड काढून टाकीत होते; म्हणून माझी परडी जरा रिकामी राहिली. नंतर गप्पा निघाल्या; तेव्हा, ती पण गप्पाच मारीत होती, कमलिनी!

कमलिनी : अग, असच असते. जे झाडं लावतात, त्यांच्या पानाफुलाला लागलेली कीड झाडून, त्यांना पाणी घालतात; आणि त्यांची जोपासना करितात, त्यांच्या फुलांच्या परड्या अशाच रिकाम्या राहतात. आणि जे दुसऱ्यांनी वाढविलेल्या फुलझाडांना यशाची फुले लहडताच ती तोडण्याला मात्र पुढे सरसावतात, त्यांच्या फुलांच्या परड्या शोभेल आणि सुवासान भरून जातात. झाडांची जोपासना करिता करिता ह्या चंपीची परडी आजवर रिकामी राहिली; म्हणूनच सखे, आज तुला तुझी परडी फुलांनी चटकन् भरता आली.

सखू : ते खरे आहे. पण, चंपा फुलझाडांची जोपासना इकडे करीत होती; तोवर आपण तिकडे काय करीत होता, ते नाही सांगितलंत काही, कमलाबाई? ही फुलझाडांची जोपासना करीत असताना, आपण तिकडे कुणाचीशी उपासना करीत असता म्हणे आजकाल-

चंपा : ती ग कोण्या देवाची, सखे?

सखू : अग सगळ्या देवांचा देव कोण?

चंपा : महादेव!

सखू : त्याला दुसरे नाव काय आहे?

चंपा : शंकर!

सखू : अग, त्याचीच हो! कमलिनी की नै, त्या शंकराचीच उपासना करीत असते बरे!

कमलिनी : काय ग चहाटळी! (तिला फुलांच्या माळेन मारते) कोण ग शंकर?

चंपा : अग, कोण म्हणजे काय?

पद ३ रे

व्याघ्रांबरधारी, ना तरि नंगी । रमत मसणि जी स्वारी ।। ध्रु.।।

भंगड जोगी भिल्लिणिमागे । भटकत भाळुनिया भारी ।। १ ।।

तर मग कमलिनी! हा एवढा परिश्रम करून तू जी ही फुलवाडी लावलीस; तिचा तुला आता फारसा उपयोग होणार नाही. शंकराव्यतिरिक्त दुसऱ्या एखाद्या सौम्य देवाची तुला उपासना करायची असती तर, त्या जाई, जुई, मोगरी, मालतीच्या फुलांच्या त्याच्या गळ्यांत मृदुल मधुर माळा घालण्याला उपयोग झाला असता. पण शंकराच्या गळ्यात माळ असणार विषारी सर्पाची! तेव्हा तू आता फण्यार, मण्यार, फुरस, नाग इत्यादि जातींच्या निरनिराळ्या रूपरंगाच्या सापांची जोपासना करण्यासाठी वारुळे केलेली एक सापवाडी लावे इथे! म्हणजे त्या सापांतील प्रत्यही ताजे ताजे साप निवडून त्यांच्या गुंफलेल्या माळा त्या शंकराच्या गळ्यांत घालता येतील. तिथे या फुलवाडीचा काय उपयोग?

कमलिनी : बरे हो वहिनी! मी आपली सापवाडी लावीन. ही फुलवाडी मी तुम्हालाच देऊन टाकते हो! ज्या देवाची आपण उपासना करणार आहा, तो तरी रंगेल देव आहे ना ? माझा आपला कोणीही असो. त्या तुझ्या रंगेल किसन देवाला तर चमेली, चंपकाच्या माळा उपयोगी पडतील ना? पण माळा जरा पक्क्या दोऱ्याच्या करा हो! नाही तर गोपींच्या ओढाताणीत तुटून जायची पटकन. सोळा सहस्त्र नारी त्याच्या पीतांबराचे सोगे ओढू पहात असतात. पण एकीच्या हाती लागेल तर शपथ!

सखू : बरे, आता तुम्ही दोघी, पीतांबरांचे आणि व्याघ्रांबरांचे सोगे ओढीत सुखान इथे नांदा हो! मला आता गेलंच पाहिजे. चल ग चंपे, वाटून घेऊ ही फुले!

चंपा : खरच संध्याकाळ होते आली. मला पण गेलंच पाहिजे

कमलिनी : बरी वाटू देईन ती फुले तुम्हाला तशी! आज ह्या वृंदावनासमोर आपण काही सुद्धा खेळलो नाही. मी किनई आज आपल्या टिपऱ्यांच्या मेळ्यातील सर्व मैत्रिणींना टिपऱ्यांचा नाच खेळायला आमंत्रण दिले आहे. आता येतच असतील त्या इकडे.

सखू : चंपे, म्हटले नाही तुला मघा, की, या फुलवाडीत रासलीला लवकरच सुरू होणार म्हणून. त्याचा रंगाभ्यास करण्यासाठी खेळू दे कमलला रास!

कमलिनी : तुळशीवृंदावनासमोर काय वाटेल ते बोलता ना ग?

सखू : अग, वाटेल ते काय बोललो तुळशीसमोर? जे तुळशी कृष्णासमोर करी, तेच तू पण कर, इतकेच म्हटले बरे?

चंपा : अग याही आल्याचे साऱ्या पहा वेळेवर!

पद ४ थें

नवपारिजात माला ही, प्रभु काही, परडीत माझिया नाही ।। ध्रु.।।

प्रीतीभरे परि तुलसीदलची । अर्पि तुला हरि घेई ।। १ ।।

पद ५ वे

केतकी सनाग, कंटकित गुलाब जे ।

सुगंधी सुरूपी न ते तिजसी मोल ।। ध्रु.।।

पतित हृदय वृंदा-वनज तुळस छंदा,

(तरि) प्रभुजी धरी तवचि लोल ।।

(नाचता नाचता बाकी मुली जातात. चंपा, सखू कमलिनीच्या गळ्यांत मिठी मारतात.)

चंपा : कमळे, तुला सोडून आम्हाला जाववतच नाही.

सखू : खरच, काय ग? कामुक प्रियकराचे अलिंगन आपल्या ह्या स्नेहाच्या मधुर मिठीइतके गोड असेल का ग?

चंपा : मला किनई असे वाटते की आपण तिघींनी जन्मभर असच लहान रहाव, कमळे! आपण जन्मभर अशाच आनंदात एकत्र राहू शकू का ग?

कमलिनी : असे का विचारता माझ्या लाडक्यांनो? पण खरच सांगू का, मलाही कसलीशी शंका व्याकूळे करीत आहे, अशा प्रेमळे सुखाचा क्षण मला पुनः जन्मात लाभेल की नाही, असे काहीस वाटते! तथापि अशा सुखात आपण जन्मभर एकत्र राहण न राहण हे जरी योगायोगावर अवलंबून असले, तरी निदान कुठेही असलो तरी एकमेकींवर असे उत्कट प्रेम आजन्म करणे हे तर आपल्या हाती आहे ना? घ्या मला अशा (तिघी पुनः मिठ्या मारतात.)

चंपा, सखू : जाऊ आम्ही आता?

कमलिनी : हो, जा बरे! उशीर झाला आहे. रागावतील नाही तर तुमच्या घरची माणस, जा बरे! ह. जा (जातात. शंकर प्रवेश करतो)

शंकर : पाहिली बरे का, सगळी ती प्रेमलीला आपल्या मैत्रिणींची--

कमलिनी : अगबाई! कोण, शंकर! मोठा चोरटा आहेस तू. आणि किसनभाऊ कुठे आहे?

शंकर : तो महा लबाड आहे. तुला नि मला असे एकान्तात बोलायला सापडाव म्हणून केव्हा केव्हा जाणूनच असा निसटून निघून जातो.

कमलिनी : पण त्याला चोरून बोलावे, असे माझ्यापाशी बोलायला आहे तरी काय? शंकर, असा भाऊ मला जन्मोजन्मी मिळणार नाही. मी त्याच्यापासून आणि तो माझ्यापासून, काही देखील चोरून ठेवीत नाही. तुझी आणि त्याची जेव्हा दाट मैत्री जमली आणि तू आमच्याच घरी रहायला आलास आणि तुझे माझे उमलत प्रेम त्यान निरीक्षिल, तेव्हापासूनच तो मला म्हणू लागला "मी माझी स्नेहदक्षिणा म्हणून शंकरालाच तुला अर्पण करणार आहे बरे का, ताई?" एकदा नाही कारे, भाऊची खोडी काढून जी पळाले ती त्या प्राजक्ताच्या झाडाआड लपले. भाऊंनी तुला सांगितले, आण धरून तिला. तू छपत आल्याने मी अचानक तुझ्या हातात सापडले. आणि पुनः सुटून पळणार तो तू माझा हात तुझ्या हातात गुंफून मला धरून ठेवलस. त्या वेळेला तुझ्या त्या स्पर्शानं

पद ६वे

नाम किंवा काम ना । कथित कवणा कामना ।। ध्रु.।।

देइ शिवुनी त्या क्षणा मधुर मूर्च्छा या मना ।। १ ।।

असे वाटले की, तसेच तुझ्यापाशी जन्मभर उभे राहाव. त्या दिवशी माझ्या आयुष्याच्या आकाशात नवीन उगवलेली त्या प्रेमाच्या उषेची छटा मी लज्जेन आईच्या दृष्टीस देखील पडू दिली नाही. पण भाऊपासून काही ती लपविली नाही. तेव्हा त्यान किनई अगदी एखाद्या सखीसारखे मला एकान्तात त्या नवीन भावनेचा मोहक अर्थ सांगत काय म्हटले म्हणून सांगू?

शंकर : कमल! किसनच्या विश्वासावर असा तुझा एकटीचाच अधिकार नाही, तर माझाही तितकाच अधिकार आहे बरे का? त्या दिवशी

पद ७ वे

लोचनि लोलुप तुझिया या, पीता पलभरि सौंदर्या,

लीलामिषें मीं हृदयासि घे या ।। ध्रु.।।

पुलकांची गीती ती, गेली गोड किती

जीवाभावांचे गाणे गाउनिया ।। १ ।।

आणि मी त्याच दिवशी त्याला सांगितले. खरोखर कमळे, काल किसनन ईश्वरसाक्ष तुझा हात माझ्या हातात देऊन माझ्यावर जे अगणित उपकार केले ते मी जन्मोजन्मी विसरणार नाही. आता तुझे वडील जानबा काय म्हणतील तेवढीच भीति आहे. एकदा का त्यांनी पण हो म्हटले, म्हणजे माझ्या लडिवाळे कमळे, आपल्या दिवसाच्या उषेची ती पहिली छटा उमटताना धरलेला हा तुझा हात, मी माझे हातात असाच गुंफून प्रेमाच्या प्राजक्ताखाली आपली जीवनाची संध्याकाळची शेवटची छटा मावळते; तो, तुला अशीच धरून ठेवीन.

कमलिनी : मनोहर तरुणा! धरून कशाला, त्या दिवशी तुझ्या हातातून मी सुटू पहात होते पण आज तुझ्या जीवनाशी अशी लगटू पहात आहे.

शंकर : तो मदनमनोहर कमलाकर आमच्या या प्रीतीसंगमाला साक्ष असो.

कमलिनी : तो मदनगर्वहर श्रीशंकर आमचा ही प्रीतीसंगम मंगलास्पद करो.

(किसन प्रवेश करतो.)

www.savarkarsmarak.com

किसन : हे काय, कमले, आता तू शंकराचे नाव घेतलंस नाही का? आता असे उठल्या बसल्या शंकराचे नाव घ्यायची सवय सोडायची बरे का? आता नात बदलल आहे. आपल्या हिंदूच्या बायका पतीच नाव घेत नाहीत असे येता जाता!

कमलिनी : बरे हो भाऊ? हा तुझा निरोप माझ्या भावी वहिनींना, त्या चंपाताईंना आताच्या आता जाऊन सांगते हो. लग्नाच्या आधी नवऱ्याच्या नांवाने हाका माराव्या वाटेल तितक्या पण लग्न होताच नवऱ्याच नाव अगदी टाकून द्यावे हा बायकांचा धर्म आहे- असे किसनन तुला सांगितले आहे, म्हणून चंपीला जाऊन आता सांगते.

किसन : आत्ता जातेस? जा, बापडी. पण एक उत्तम बातमी ऐकायला राहिले नाही म्हणीन तूच पस्तावशील.

शंकर : खरच कारे, एखादी बातमी आणली आहेस?

किसन : एक सोडून, दोन परम मंगलास्पद वार्ता मी तुम्हाला सांगायला आणल्या आहेत. पहिली ही की, जानुबाबांना मी जेव्हा सांगितले की कमलिनीला मी शंकरला देऊ केली, तेव्हा त्यांनी मोठ्या आनंदान संमति दिली आणि दुसरी वार्ता म्हणजे आपल्या बाबांचे आणि आम्हा सर्व महारांचे सद्गुरू श्रीसंत चोखामेळा, यांच्या दर्शनाला पंढरपुराला आपण तिघांनी जावे, म्हणून त्यांनी आज्ञा केली. बाबांना म्हातारपणामुळे आता हालवत नाही म्हणून मीच तुम्हा दोघांना संत चोखामेळ्याच्या दर्शनाला न्याव आणि त्यांच्या पायांवर घालावे, असा त्यांचा मानस आहे. शंकर, आता तुझा मी वाङ्निश्चित मेहुणा झालो! चला! प्रथम तुम्हाला बाबांच्या चरणांच वंदन केले पाहिजे. चला.(जातात.)

प्रवेश ३ रा

(चोखामेळा हातात खराटा घेऊन पंढरपूरच्या प्रदक्षिणेची वाट झाडीत आहे.)

(भजन- गोपाल)

चोखा : अहाहा! रात्र संपून दिवस उजाडायच्या संधीची ही उषःकालची वेळ किती शांत आहे! पापाची मध्यरात्र उलटून पश्चात्तापाची उत्तररात्र संपली असता, पुण्यकाळाचा उदय होण्याच्या संधीला मंगलोन्मुख मन जसे निर्मल आणि शांत होऊ लागते; तसे आकाश निर्मल आणि शांत दिसत आहे. संतांचा एखादा पवित्र अभंग ऐकताच मनाला जसा मंजूळे आनंद होतो, तसा आनंद त्या चिमुकल्या पक्ष्यांची ही पहिली लकेरी माझ्या मनाला देत आहे; छेः! पण ही तुलना चुकत आहे. कारण हे माझ्या कानांनो! हा लकेरीचा आनंद तुमच्यांतच गुरफटून राहत आहे. तो संतांच्या अभंगासारखा झरत झरत आत्म्याला जाऊन पोचत नाही. तो दिखावू आहे. ह्या पक्षांच जे हे गाणे माझ्या अद्रियांना सुखकर लागते आहे, ते स्वरूपतःच सुखकर आहे की नाही, हाही प्रश्नच आहे. क्वचित् त्या चिमुकल्या पाखराला त्याची इवलीशी प्रिया अजून भेटायला आली नसेल; म्हणून विरहान अशांत होऊन तिला बोलावीत असलेली ही त्याची लकेरी म्हणजे त्याच्या व्याकूळे हृदयाची संगीत तळमळे असेल. छे! छे! ज्या संगीतान जिवाची व्याकूळे तळमळे सर्वस्वी शांत होते, ते संगीत म्हणजे, श्रीहरींचे ते मनोहर नामस्मरण होय! गोपाला! गोविंदा! माझ्या भक्तीच्या या उषःकालात आता तुझ्या ज्ञानमय प्रकाशाचा प्रत्यक्ष उदय होऊ दे!

जनक तू माझा जननी जगाची । करुणा आमची का हो नये

कासया संसार लावियेला पाठीं । पडलीसे तुटी तुम्हा आम्हा

जन्म, जरा, मरण, आम्हा सुखदुःख । पहासी कौतुक काय देवा ।।

गहिवरुनी चोखा उभा महाद्वारा । विनवी जोडुनि करा विठोबासी ।।

(एक रस्त्याने जाणारे गृहस्थ प्रवेश करतात.)

गृहस्थ : ए महारड्या! तू रस्ता झाडतोस, का तो अडवून धरतोस! थांब, ती धूळे उडेल माझ्या अंगावर! काय हे धेड शेफारले आहेत. मार्गावरचा झाडूवाला खराट्यान नाली साफ करिता करिता, यांना भजन करायला हवी आहेत? काय रे महारड्या! काय म्हणतो आहेस त्याचा अर्थ तरी कळतो काय तुला?

चोखा : महाराज

वेदाचा अनुभव शास्त्राचा अनुवाद । नामचि गोविंद एक पुरे ।।

चोखा म्हणे मज काहीच नकळे । विठ्ठलाचे बळे नाम घेतो ।।

गृहस्थ : ह सावध रहा. जर का वेदाबिदांचा नामोच्चार करशील; तर कान उपटले जातील, समजलास? विठ्ठलाचे हात कटीवर चिकटलेले आहेत, ते तुझ्याकरता काही तो हालवणारे नाही. पण आमचे हात मात्र अगदी मोकळे आहेत. थोबाड फोडून देऊ हाती. धेड कुठला. हो दूर, दूर, विटाळशील सावली पाडून मला. (जातो.)

चोखा : देवा !

पंचही भूतांचा एकचि विटाळ । अवघाचि मेळे जगीं नांदे ।

तेथे तो सोवळा ओवळा तो कोण । विटाळ कारण देह मूळा ।।

चोखा म्हणे मज नवले वाटते । विटाळापरते आहे कोण ।।

(किसन, शंकर, कमलिनी येतात नि चोख्याचे पाय वंदन करितात.)

चोखा : हां हां! हे काय मी एक यःकश्चित् झाडूवाला महार आहे. सद्‌गृहस्थ हो! माझ्या पायाला आपण असे शिवू नका. आपण मला दुसरे कोणी तरी समजून चुकत आहा!

किसन : नाही महाराज, आम्ही मुळीच चुकत नाही. मी किसन आणि ही माझी बहीण कमलिनी, आम्ही दोघ मायापूरच्या जानबामहाराची मुले आहोत. आणि हा शंकर, आमच्याच महारवाड्यातील एक तरुण असून, त्याला ही कमलिनी वाचादत्त झालेली आहे. जानबा, आपले शिष्य, आपणांला आठवत असतील. आपल्या दर्शनासाठी आम्हाला त्यांनीच धाडले. ते मात्र आता अगदी वृद्ध झाल्याने येऊ शकले नाहीत म्हणून फार दुःखी आहेत.

चोखा : या असे. रस्त्याच्या बाजूला असलेल्या या दगडावर बसू या. जानबांची मला आठवणे आहे. पण मायापुराहून या मुलीला इतक्या लांबवर कशी आणलीत? गाडीबिडी केली आहात की काय?

शंकर, किसन : नाही महाराज, आम्ही दीन दरिद्री, घरची गाडी कुठली? भाड्याची किंवा भिकेची मागावी; तर, महाराज, भाड्यान देखील कोणी गाडीत घेत नाही. मग भिकेवारी कोण घेणार?

चोखा : तर मग पायी येथपर्यंत येण्याचे कष्ट हिला कशाला दिलेत? इतका लांब प्रवास ह्या वयाच्या मुलींना झेपत नाही. आणि हे काय? भजनाचे साहित्य टाळे, मृदंग पण बरोबर आणले आहांत? बैस, बाळे!

कमलिनी : महाराज! आपल्या या पायांच्या दर्शनाने माझ्या प्रवासाचा सर्व शीण हरण झाला. माझ्याहून दरिद्री कुळातल्या मुलींना, नित्य मोठमोठाले भारे किंवा मोळ्या डोक्यावर घेऊन पंढरपूरला येताना मी पाहते. त्यांच्या दुःखाची कल्पना मला नको का यायला? नाहीतर त्यांच्या दुःखाची दया मला येणार नाही. आणि त्या जर चार पैशांसाठी पंढरपूरला पायी प्रवास करीत येतात; तर, जन्मोजन्म न लाभणार आपल्या चरणांच्या दर्शनाच पुण्य जोडण्यासाठी मी हा प्रवास केला तर त्यात विशेष ते काय केले? मी होऊनच आले, महाराज, पायी!

शंकर : पण महाराज, एक विनंती आहे. आत्ता आम्ही आपला पत्ता माहीत नसल्याले ह्या इकडून गेलेल्या गृहस्थाला विचारले की, संत चोखामेळा कुठे आहेत? तेव्हा तो रागाने गुरगुरत म्हणाला, "संत चोखामेळा कोण, ते तुझ्या बापाला माहीत असेल, पण इथे खराटा घेऊन प्रत्यही सकाळी नगराचे मार्ग साफ करण्याचे काम करणारा एक झाडूवाला चोखामेळा आहे. तो हा इथंच झाडू मारीत आहे." असे तो उद्धटपण म्हणताच मला मेल्याहून मेल्यासारखे झाले. खरच का महाराज, रस्त्यातील झाडूवाल्याचे काम आपल्याला करावे लागते?

चोखा : होय! अर्थांतच. आपण महार. आपला धंदाच आहे तो. त्यात अपमानास्पद ते काय आहे?

शंकर : कसे नाही? भगवद्भक्तीत जो रंगून गेला आहे, जो निष्पाप, निर्वैर आणि निर्मल संत आहे; त्याला केवळ तो महारकुळात उत्पन्न झाला म्हणून क्षुद्रांतील क्षुद्रही जे नीच काम करायला प्रवृत्त होणार नाही, ते रस्ते झाडण्याचे काम करावंच लागावे, हे अपमानास्पद नाही, तर काय? स्पृश्य जातीतल्या चोर, लुटारू, गळेकापू इत्यादि पाप्यांनी केलेली ही गदळे घाण, आम्ही महारांनी धुऊन झाडून काढलीच पाहिजे. हा म्हणे आमचा धंदा ! हाय हाय! आम्हा महारांच जीवन असे गावची घाण काढण्यात आणि नाले उपसण्यात व्यर्थ जाणार ना?

किसन : महाराज द्या तो खराटा इकडे! ज्या हातात एखाद्या शंकराचार्याचा धर्मदंड किंवा राजाचा राजदंड शोभावा, त्या हातात ही झाडवणे घेतलेली मला बघवत नाही, यापुढे गावच्या वाटा झाडण्याचे हे काम आम्ही पाळी पाळीन इथे आहो तोवर तरी, करू. द्या तो खराटा. (खराटा घेऊ लागतो.)

चोखा : बेटा, थांब थांब! माझ्या हातातील हा दंड, जर खरोखरच शंकराचार्यांच्या हातातील धर्मदंड, किंवा एखादा राजदंड असता; तर मी तुझी विनवणी मान्य केली असती. पण बेटा, हा दंड म्हणजे माझ्या पंगुभक्तीच्या हातांतील एकमात्र आधाराची काठी आहे. हे नगरातील मार्ग, ही प्रदक्षिणेची वाट, लोकांच्या पायांनी तुडविलेली धूळे आणि लोकांनी केलेली ही घाण झाडून टाकण्याचे, साफ करण्याचे, क्षुद्रातील क्षुद्रही जे काम करणार नाहीत, ते करण्याचे माझ्या वाटणीला आले हे मी आपले महद्भाग्य समजतो. ह्यासाठी मी जन्मोजन्मी महार जातीतच जन्माला यावे, अशी माझी ईश्वराला प्रार्थना आहे. अंबारीत चढून सर्व जगाच्या डोक्यावर लटकणारा राजदंड धरण्यासाठी लोभ, मनुष्यमात्राचा हात पुढे करून सज्ज आहेच. परंतु त्या राजदंडाइतका मनुष्य जातीच्या जीवनाला आणि समाजाच्या सुखाला अवश्य असलेल्या; ह्या झाडणीच्या दंडाला शिवण्याला मात्र कोणीही संतुष्टपणे उद्युक्त नसतांना, ते समाजाच अडलेले काम आम्ही महारांनी करावे; यांत आमचे जीवन व्यर्थ जात नसून, उलट त्याचे विशेषच सार्थक होते आहे.

किसन : महाराज, आपला उपदेश किती तरी सोज्ज्वल आहे.

शंकर : तर मग आम्ही महारांनी कुत्र्याच्या पायांन उडविलेली नगरमार्गांतील धूळे झाडीत, लोकांच्या घाणीत आणि रस्त्यावरील मातीत लोळावे; आणि क्षत्रियांनी मात्र राजदंड धरून केशर कस्तुरीच्या सुवासिक उट्यांनी निर्मल आणि शोभिवंत राहून, ज्यांच्या उपकाराने त्यांना तसे शोभिवंत राहता येत; त्याच महारभंग्यांना पापयोनि म्हणून पशूंहून अपवित्र मानाव, ही सामाजिक कर्तव्याची वाटणी, आपणाला योग्य वाटते का?

चोखा : नाही. बलात्काराने कोणत्याही जातीला आधी नीच वा पापयोनीतील म्हणून हिणवणे आणि नंतर गदळे कामं तितकी त्यांच्याकडूनच, त्या कल्पित पापयोनित्वाच्या आधारावर बळाने करवून घेणे, हे अर्थातच अन्यायाच आहे. परंतु उलटपक्षी हेही ध्यानात ठेविल पाहिजे की, समाजाची घाण जर काढली गेली नाही तर, सामाजिक आरोग्याचा नाश होणार असल्याकारणान कोणीतरी ती घाण काढलीच पाहिजे. मग ती महारांनी तरी का काढू नये? अमुक कर्म उच्च आणि अमुक कर्म नीच, अमुक कर्म पवित्र आणि अमुक अपवित्र, ह्या कल्पना जर हिंदुसमाज सोडून देईल; आणि लोकहितसाधक ते ते कर्म पवित्रच आहे असे समजेल; तर, हा परस्पर मत्सर उत्पन्न होणार नाही. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।' समाजाच मानसिक किल्मिष हरण करून, त्याचे आत्मिक आरोग्य राखण्यासाठी साधुसंत झटतात. समाजाच दैहिक किल्मिष हरण करून त्याचे भौतिक आरोग्य राखण्यासाठी आम्ही महार झटतो; कर्तव्यबुद्धीन. अशा साम्य निष्ठेन पाहिले असता मला ही दोन्ही कर्तव्ये पवित्रच वाटतात. हत्तीवर चढून जो कोणी सत्तेच्या अंबारीत उंच बसतो, त्याच्या मस्तकापेक्षा नरांची पायधूळे झाडताना जेव्हा कोणी

वाकतो तेव्हा त्याच्या अहंकाराचा ताठा कमी झाल्याने त्याचे मस्तक सहजच नारायणाच्या चरणाच्या अधिक सन्निधच गेलेले असते.

किसन : महाराज, आपले हे अमृतमय शब्द ऐकून सामाजिक कर्तव्याच्या वाटणीत सामाजिक घाण काढून टाकून सामाजिक आरोग्यरक्षणाच हे अत्यंत किळसवाण परंतु म्हणूनच अत्यंत उपकारक कर्तव्य, आम्हा महारांच्या वाट्याला आल्याने परोपकाराचे शिक्षण घेण्याची ही सोन्यासारखी संधिच आम्हाला लाभली, असे मला वाटू लागले आहे.

शंकर : आणि ज्या समाजाच्या आरोग्यरक्षणासाठी, आम्ही महार हे अत्यंत घाणेरडं कर्तव्य करतो, त्याचे आम्हा महारभंग्यांना, तोच उपकार केला म्हणून कुत्र्याहूनही अस्पृश्य आणि पापयोनि मानण्याची आणखी एक सोनेरी संधि त्या समाजालाही लाभली!

चोखा : शंकर! इतरांना पवित्र आणि शुचिर्भूतपणे जाता येता यावे म्हणून, ज्याचे स्वतःचे अंग, चिखलात आणि धुराळ्यात भरलेले आहे, असा तो महार, हा एखाद्या भस्म लावलेल्या ब्राह्मणाइतकाच, किंवा सर्वांगाला विभूति फासलेल्या गोसाव्याइतकाच, सन्मान्य समजला गेला पाहिजे. त्याला कोणी नीच म्हणून हिणवील, तर तो त्या हिणविणाऱ्याचाच दोष होय. परंतु दुसऱ्याच्या हिणविण्यान स्वतःच्या कर्तव्याला गदळे समजून जर कोणी महार स्वतःसच हीन मानू लागला आणि असंतुष्ट होऊन रागावू लागला, तर त्या दुसऱ्याच ते हिणवणेही ठीकच होते, असे नाही का सिद्ध होणार? दुसरा हिणवतो म्हणून, जो स्वकर्तव्य आणि लोकसेवा सोडतो, तो खराचे पतित होतो. आपणाला जे पतित मानतात, त्या आपल्या धर्मबंधूची, ती चुकी सुधारण्याचा मार्ग म्हणजे, हिंदूहिंदूनी आपसांत एकमेकांचा मत्सर करणे, हा नाही. आम्ही महार, भंगी इत्यादी अस्पृश्य गणल्या गेलेल्या लोकांनी, स्वतःची राहणी इतकी शुद्ध ठेवावी, स्वतःचे मन इतके निर्मत्सर आणि हिंदुधर्मपरायण ठेवावे, स्वतःचे आचरण इतके परोपकारी आणि प्रेमळे ठेवावे, की आपल्या उच्चवर्णीय बंधूंना आपणाला हीन आणि अमंगळ लेखण्याविषयी आपण होऊनच पश्चात्ताप व्हावा. महार अमंगळ असतात, हा त्यांचा आक्षेप, आपल्या मंगल वर्तनाने आणि विनयशील सेवातत्परतेन, आपण अशक्य करून टाकावा. आपण महार आपल्या बंधुप्रेमान आपल्या हिंदु बंधूंना जिंकूं! आपल्या धर्मभक्तीन भगवंताला जिंकूं!

कमलिनी : भाऊ! भगवान् देत आहेत हा अमृततुल्य उपदेश अक्षरशः सत्य आहे.

चोखा : होय ना बाळे? तर मग तुला हे आमचे सर्व संभाषण कळत होते तर? तू भजन करतेस का कधी? तुळशीची पूजा टळू देत नाहीस ना?

www.savarkarsmarak.com

किसन : नाही, महाराज! कधीही टळू देत नाही ती तुळशीची पूजा. जानु बाबांनी तिला उत्तम उत्तम अभंग आणि पद शिकविली आहेत.

चोखा : तर मग म्हण पाहू एखाद भजन! शंकराचा ह्या, तुझ्या भावी यजमानाचा संकोच करतेस की काय?

किसन : छे;! ती, शंकर आणि मी, अगदी लहानपणापासून एकत्र वाढलो. आमच्या ताईच हे जवळजवळ स्वयंवरच झालेले आहे. तिथे संकोच कसला!

कमलिनी : भाऊ? काही काळ वेळ तरी पहावा! अशान मात्र मला संकोच वाटतो. महाराज मला गळा नाही. माझ्या भजनाचे आपल्याला हसू येईल.

शंकर : तिचा केवळ विनय आहे हा. महाराज, तिचा गळा छान आहे.

चोखा : तुला तसे वाटणारच. हे पहा त्या विषयात तुझे प्रमाणपत्र आम्ही मुळींच विश्वसनीय मानीत नाही. कमलिनी, तुला गळा नसला तरी हृदय आहे. तुला भजन आवडत ना? झाले तर, भक्ताची आवड हाच भजनाचा गळा होय म्हण बाळे.

कमलिनी : म्हणू तरी रे काय भाऊ?

किसन : ते गोविंदाच गाणे म्हण!

कमलिनी : 'हरि कुठे हरवला' मी नाही म्हणत; तो पहा शंकर हसू लागला.

चोखा : नाही बाळे हसत कोणी. भजनाला कोणी हसत नाही म्हण!

पद ८ वे

कमलिनी : हरि कुठे हरवला? झुरते ही आकुला ! सखे ! कथि गे मला ! ।। ध्रु.

गृह ग्रह तारे तारे, शोधित येथ आले; परि न गवसला ।। १

चोखा : (तल्लीन होऊन) मुली, गोपींच्या या पराभक्तीप्रमाणे जर तूही आपले प्रेम, त्या परम सुंदर श्रीकृष्णाला अर्पण करशील तर, तो गोविंद तुला अगदी तुझ्या सन्निधच सापडेल. तो ग्रहांवर नाही, ताऱ्यांवर नाही, गोकुळात नाही, तो 'मद्भक्ता यत्र गायन्ति, तत्र तिष्ठामि नारद!' (नारंभट नि देवीसिंह प्रवेश करितात.)

नारंभट : वाः! ही फाकडी पोरगी घेऊन, हा कोण रंगेल गडी इथे रासलीला करीत बसला आहे? देवीसिंह, कोण हा?

देवीसिंह : नारंभट, तुमच्या तोंडाला का पाणी सुटले? फाकड्या पोरी तितक्या तुम्हीच घेऊन बसावे की काय?

नारंभट : अर्थात्! असे गात पाखरू माझ्या आलिंगनाच्या पिजऱ्यांतच ठेविल पाहिजे. (नीट पाहून) म्हणजे! देवीसिंह, अरे हा आपल्या महार वाड्यातला तो चोखा महार! अरे लुच्चा! तिकडे टाळे घेऊन कुटीत बसतोस; आणि इकडे असा या फाकड्या पोरींना गोपी करून; आपण त्यांचा कृष्ण बनू पाहतोस काय?

देवीसिंह : खरच! अरे चोरा चोख्या! कृष्ण क्षत्रिय होता, हे विसरलास. फाकड्या पोरींना गोपी समजण्याच्या कृष्णाच्या अधिकारांचे, आम्ही क्षत्रिय, श्रीकृष्णाचे वंशज, काय ते वारस आहोत, समजलास?

नारंभट : आणि कृष्णाचा गुरु ब्राह्मण असल्याने क्षत्रिय ज्या ज्या सुंदरींना गोपी समजतील; त्यांना त्यांना आपल्या प्रियतम शिष्यिणी समजण्याचा अधिकार आम्हा ब्राह्मणांना आहे, समजलास! (पुढे येऊन) ए धेडा आता तू 'यत्रतत्र' असे काहीस संस्कृत वाक्य म्हणालास की नाही? चांडाळाला संस्कृत वाक्य म्हणण्याचा अधिकार नाही हे माहीत असता, तू महारांना संस्कृत शिकवतोस? उच्च जातींविरुद्ध बंड करायला उत्तेजित करतोस? आम्ही, ब्राह्मण आणि क्षत्रिय हे दोघेही इथे मघाचे उभे असता, उठून तरी उभा राहिलास कारे उर्मटा? आता उठतो पहा, तो महारडा!

चोखा : जोहार मायबाप! भजनात तल्लीन झाल्याने, मला आपण दिसला नाही.

नारंभट : तल्लीन तर! आजच्या भजनात, तू का नाही तल्लीन होणार? त्या फाकडीच्या त्या सुरेख देहयष्टीची ही मंजुळे सतार, जर भजनाला साथ द्यायला मिळेल; तर मी देखील आजपासून वारकरी बनेन.

शंकर : हां सांभाळ! आम्ही महार असलो तरी आमच्या मुलींचा असा उपमर्द सहन करू, असे तुम्ही समजता की काय? (अंगावर जाऊन) दात पाडून टाकीन, समजलास? जर पुनः महारांच्या मुलींविषयी कुचेष्टेचे एक अवाक्षर बोललास तर!

नारंभट : क्षमा कर! क्षमा कर! ही सुंदरी, नव्हे; मुलगी, महाराची आहे हे आतापर्यंत आम्हाला माहीत देखील नव्हते; महारांच्या मुलींविषयीच आम्ही कुचेष्टा करतो, असे नाही; तर ब्राह्मणांच्या आणि क्षत्रियांच्या मुलींविषयी देखील आम्ही कुचेष्टा करतो. कुचेष्टेच्या प्रकरणात आम्ही सर्व मुली इथून तिथून समान समजतो. आम्ही अस्पृश्यतेला मानीत नाही, तेव्हा रागावू नकोस. (देवीसिंहाला मागे ओढीत) जाऊ दे रे बाबा भिक नको पण कुत्रा आवर असे म्हणण्याची पाळी आली खरी ! जाऊ दे मरू दे त्यांना

देवीसिंह : काय करू रे! हे सगळे जर पुरुष असते; तर मी त्यांना आता क्षत्रियाच पाणी दाखवले असते! पण त्यांच्या सैन्यात एक स्त्री आहे. म्हणून त्यांच्याशी मला धर्मयुद्धाप्रमाणे लढता येत नाही. एका शिखंडीसाठी भीष्माचार्यांना देखील पांडव सेनेशी युद्ध सोडून द्यावे लागले!

नारंभट : तेवढीच जर अडचण असेल तर, त्याची तोड माझ्याजवळ आहे. तू त्या तिघा पुरुषांचा समाचार घेत असशील; तर मी एका त्या मुलीला बघून घेतो. स्त्रीयुद्ध ब्राह्मणांना निषिद्ध नाही. द्रोण शिखंडीशी लढतच असते. ह म्हण; की थोपटलेच मी बाहु ! द्वंद्व युद्धात मी एकट्यान, मी मी म्हणाणाऱ्या कित्येक स्त्रियांना चारी मुंड्या चीत केलेले आहे.

देवीसिंह : आता तसे नाही करायचे. ह्या चोखामेळ्यांच हे बंड, आपण समूळच उपटून काढू या. हा महारांना वेदमंत्र शिकवतो; मुलींना गोपीभावाचा उपदेश करून त्यांचा श्रीकृष्ण होतो, उच्चजातीविरुद्ध महारांच्या तरुणांना उत्तेजित करतो, आणि एकटा दुकटा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वा शूद्र भेटला; म्हणजे त्याला चोप द्यायला, महारांच्या कडव्या तरुणांना खुणावतो; अशी उभ्या पंढरपुरात आपण घोषणा करू चल!

नारंभट : चल! रसाळे ओठाच्या त्या पोरीच नुसत नाव घेताच, या धेडाने माझे दात पाडून टाकण्याची धमकी दिली, त्याच त्या पोरीचे तेच रसाळे ओठ, त्याच ह्या माझ्या दातात द्राक्षासारखे अलगत धरून जसा भीमसेन दुःशासनाच रक्त घटाघटा प्याला, तसेच तिचे अधरामृत चुटचूट पिईन तरच मी नांवाचा ब्राह्मण. सूड! सूड! सूड!

देवीसिंह : अरे! अगदी भीमसेनच झालास की! तुझी प्रतिज्ञा खरी केलीस तर तू खरोखरच नांवाचा ब्राह्मण होशील, कारण ही पोरगी महाराची आहे, हे नाही तुझ्या ध्यानात आले.

नारंभट : असे ना! ‘स्त्रीरत्नं दुष्कुलादपि’, पण, ती महाराची नाहीच! अस्पृश्याची नाहीच!

देवीसिंह : कशावरून?

नारंभट : मला तिला शिवावस वाटते आहे, ह्यावरून! 'सतां हि संदेहपदेषु स्त्रीषु, प्रमाणसर्वं करणे प्रवृत्तयः!'

(जातात. चोखामेळ्याची बायको येते.)

सोयरा : नाथ, झाले तरी काय? मी ही प्रदक्षिणेची अर्धी वाट झाडून आले तरी आपण कोठे दिसानातच; आणि हे दोघे त्या दोघांच्या अंगावर तुटून पडलेले का दिसत होते? ही मुलगी कोण?

शंकर : (नमन करून) माते! आम्ही तुला ओळखले. आमच्या ह्या संत गुरूंच्या पत्नीपदाला सर्वथैव योग्य अशा आपण सोयराबाईच आहात. माते, ह्या तुझ्या पूज्य पतीचा आणि आम्हा महार ज्ञातीच्या शिरोभूषणीय संताचा दोघा दुष्टांनी अपमान आणि धिक्कार केला, इतकेच नव्हे तर, ह्या माझ्या भावी पत्नीचाही विनाकारण उपमर्द करण्यालाही, त्या दुष्टांना लाज वाटली नाही. म्हणून मी त्यांच्यावर चालून गेलो होतो. जर गुरुजींनी मला दाबल नसत, तर मी काय करून गेलो असतो; ते मला सांगता येत नाही. हे म्हणे ब्राह्मण ! आणि क्षत्रिय! ह्या क्षत्रियांइतके व्यसनी, दुष्ट आणि छळ करणारे लोक पृथ्वीवर दुर्मिळे आहेत आणि हे ब्राह्मण तर, पापपुण्याची लाज कोळूनच प्याले आहेत!

चोखा : हा हा! बेटा, ब्राह्मण ज्ञातीविषयीचे असे विषारी उद्‌गार काढून तू आपली जीभ विटाळू नकोस ! आपल्या हिंदु धर्माच्या महादेवाचा तृतीय ज्ञाननेत्र म्हणजे ब्राह्मण होय! ब्राह्मण होता; म्हणूनच ब्रह्मज्ञान जगात जिवंत राहिल. कोण ती त्या जातीची तपस्या ! ती बुद्धि ! ती दया! त्याग हाच ज्यांचा भोग, पर्णकुटी हाच ज्यांचा प्रासाद आणि संन्यास हाच ज्यांचा संसार! असे एक नाही; दोन नाही; अनंत महात्मे आणि हुतात्मे, ज्या ज्ञातीत उत्पन्न झाले आहेत, त्या ब्राह्मण ज्ञातीला माझे शतशः वंदन असो! त्यांच्यातही काही लोक दुष्ट असतील; क्षत्रियातही छळक लोक असतील; पण म्हणून हेही विसरता कामा नये की श्रीराम क्षत्रिय होते, श्रीकृष्णही क्षत्रिय होते आणि त्या गुरूंचेही गुरु वसिष्ठ आणि सांदीपनि हे ब्राह्मण होते!

सोयरा : आता माध्याह्नाचा समय होते आला आहे. तर नाथ ! मला वाटते, ह्या पाहुण्यांना घेऊन आता घरी चलावे. चल बाळे.

चोखा : आणि आज आम्हा दीनांच्या घरी, दोन घास खाऊन आतिथ्याच पुण्य आम्हाला लाभू द्या. चला आमच्याबरोबर भजन करीतच घरापर्यंत सर्वजण चला.

शंकर, कमलिनी, किसन : गुरूंची ही आज्ञा म्हणजे आम्हा पतितांवर केलेला एक अनुग्रहच आहे.

(भजन करीत जातात.)

पद ९वे

हे असे जगत्, नवे नवसांचे ।। ध्रु.।।

परंतु दास होसि सौख्याचा । तरि तू ग्रास होसि दुःखाचा ।

की असे जगत् दो दिवसांचे ।।

## अंक दुसरा

### प्रवेश १ला

(नारंभटाचे घर. देवीसिंह आणि नारंभट बोलताहेत.)

नारंभट : नाही रे! मी त्या आडमुठ्या यात्रेकरूला, दुसरे काही म्हटले नाही. तो म्हणाला आज माझ्यापाशी दक्षिणा नाही, तर मी सहज म्हटले, तर मग कुणबटा, तुला फुकट स्नानमंत्र कोण तुझा बाप सांगेल? कुणबी लोकांना तुम्ही आम्ही, असे पन्नासदां म्हणतो, पण काल तो चिडून अंगावर आला, नि म्हणाला दात पाडून टाकीन. मी म्हटले, अरे, अरे मी ब्राह्मण सोवळ्यात आहे, दातच पाडायचे तर- दुरून पाड, मला शिवू नकोस. तेव्हा तो जात जात म्हणाला, "मी कुणबट आणि तू भट्ट काय? पण अशा भट्टाहून, तो चोखा महार देखील बरा." छेः! देवीसिंह, या चोख्या महाराचे स्तोम या नीच वर्णांत फारच माजत चालल आहे; यात शंका नाही. तो फूस देतो; म्हणून हे आमचा असा धिक्कार करतात ही शंका ह्या उदाहरणावरून सिद्ध होते नाही काय?

देवीसिंह : ह्याच प्रायश्चित्त, सनातन धर्मसंरक्षक, क्षत्रिय कुलावतंस देवीसिंह चोख्यास लवकरच देईल. भिऊ नकोस. मी पंढरपुरात जिकडे तिकडे त्याचे विरुद्ध ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आदि लोकांस उठविल आहे. त्या चोख्याविरुद्ध सर्व हिंदूचा कट उभारला आहे. आणि ती फटाकडी आपल्या हातात घेण्याचीही उत्तम व्यवस्था केली आहे. तो इब्राहिम आहे ना? आपल्या येथील मुसलमानी सुभेदार बंगषखान याचा मेहुणा-

नारंभट : म्हणजे? तू त्या मुसलमानाला, या आपल्या शुद्ध हिंदु कटात घेणार की काय? हे पहा, मी पापी असलो तरी, ब्राह्मण आहे, महाराची पोर झाली तरी ती हिंदुच आहे. मी मुसलमानाच्या हातात तिला पडू देणार नाही आं! मुसलमान हिंदुधर्माचे केवळ शत्रु, तिला बाटवतील.

देवीसिंह : हो, हो, हो, अहो धर्ममार्तंड, घाबरू नका. अस्पृश्यांच नाव निघताच ज्या तुमच्या कपाळाला, तिरस्काराच्या आठ्या पडतात, त्याच तुमच्या हृदयांत, त्या महाराच्या पोरीविषयी, केवढी ही धर्मबंधुता उत्पन्न झाली? ती पोरगी तो मुसलमानी अधिकारी उपटीने आणि मग त्या सरकारी लोखंडाच्या गजांच्या पिजऱ्यांतून, ते पाखरू पुनः तुमच्याकडे उडत येणार नाही, ही भीति पडली वाटते? पण त्या पोरीला मी आपल्याचे हाती ठेवणारे आहे, हो!

नारंभट : ठेवणारे, पण कुठे?

देवीसिंह : अरे, आजपर्यंत अशा रानपाखरास धरताच, आपण ती ठेव जिच्या मोहक पिजऱ्यांत आजपर्यंत ठेवीत आलो, त्या गंगाजीच्या वेश्यागारांत! ठीक आहे. बरे आता तुझे काम म्हणजे, मी नवीन कुलंगड उपस्थित केले आहे, त्याचा उलगडा करणे होय!

नारंभट : हे पहा, आजपर्यंत झाले ते झाले. आता नवीन कुलंगडी उपस्थित करण्यात, मी ब्राह्मण तुला साथ देणार नाही.

देवीसिंह : परंतु हे नुसत कुलंगड नाही- सोनेरी कुलंगड आहे. हे पहा, इथेले प्रमुख संभाजीराव पाटील आहेत ना? त्यांचा द्वितीय संबंध झालेला आहे.

नारंभट : काय, काय म्हणतोस?

देवीसिंह : (स्वगत) कसे ब्राह्णणान कान टवकारले पण ! - (उघड) आणखी त्याचे घरी त्या तरुणबांड पत्नीला-मालिनीबाईला- सांभाळण्यास तिची वृद्ध मावशी ठेवलेली आहे. तिच्यापाशी धन विपुल आहे. तेव्हा तिथे तुम्ही कसाबसा शिरकाव करून घ्यावा. साधल्यास त्या तरुण मालिनीचा सुवर्ण आणि त्या म्हाताऱ्या मावशीचे सुवर्ण अशा उभयविध सुवर्णांची, आम्हातुम्हास मनसोक्त लूट करिता येईल. त्या विरहित त्या संभाजीरावास, जर का आपल्या मुठीत ठेवता आले, तर आपल्यास प्रत्यही जी अनेक कुलंगडी उपस्थित करावी लागतात त्या सर्वांत त्या पाटलाच्या पाठीच्या प्रबळे ढालीचा आश्रय आपल्यास फारच उपयोगी पडेल. चोख्याची खोड मोडल्यानंतर संभाजीराव आपला उजवा हात होऊ शकतील.

नारंभट : हे सर्व मनोराज्य आहे उत्तम, पण संभाजीराव आपल्या मुठीत गवसण्याइतके सद्गुणी आहेत का?

देवीसिंह : नसते तर मी त्याचे नाव तरी काढले असते का? दुर्गुणांच्या वाऱ्यास देखील मी उभा राहत नाही.

नारंभट : काय काय सद्गुण आहेत त्या पाटलांत?

देवीसिंह : प्रथम ते अगदी ढ आहेत. अगदी भोळा, अगदी प्रेमळे आणि हरबऱ्याच्या झाडावर वाटेल तितका उंच चढण्यास सदा उद्यत--

नारंभट : पण त्याला ज्योतिषाची आवड आहे का?

देवीसिंह : अरे, आवड म्हणून काय विचारतोस? आपण सांगितलेले भविष्य खोटे ठरले, असे स्वतः ज्योतिषी जरी सांगू लागले तरी देखील, ते खोटे ठरले असे संभाजीराव मानणार नाहीत. तर या नाही त्या प्रकार ते खरच ठरले असे प्रतिपादितील.

नारंभट : वा! मग मात्र तो अगदी सर्वगुणसंपन्न पुरुष आहे. यात काही शंका नाही. आता असे कर, तुझी ओळख आहे ना तिथे?

देवीसिंह : तर! आजच मला त्यांनी त्यांच्या तरण्याबांड मालिनीपाटलीण बाईसाठी एखादा पुराणिक मिळेल का म्हणून विचारले! तेव्हा तर ही सगळी सूत्रे चटकन माझ्या डोक्यात जुळली.

नारंभट : मग तर प्रथम तिकडे जा. मी एक अनोळखी ज्योतिषी म्हणून सहज हिंडत हिंडत तिथे येतो. मी जसजस त्यांचे पूर्ववृत्त सांगेन, तसतस तू आश्चर्यान मुग्ध होऊन माझी बडेजावे करीत चल.

देवीसिंह : अरे, पण हे पूर्ववृत्त सांगण्याइतका ज्योतिषाचा अभ्यास, तुझ्या सात पिढ्यांतही कोणी केल्याचे माझ्या माहितीत नाही. मग आता तसाच एखादा ग्रंथ तुझ्या संग्रहात असल्यास सांगवत नाही.

नारंभट : आहे, तसाच ग्रंथ आहे माझेपाशी

देवीसिंह : तो कोणता?

नारंभट : कोणता म्हणजे काय? प्रत्यक्ष तू! तू मला त्या पाटलाचे काय ते वृत्त सांग आणि नंतर मी ते अनोळखी म्हणून तिथे येऊन जसे जसे सांगेन तशी तशी तूच वाहवा करीत चल. ज्योतिष शास्त्रातील हा ग्रंथ अमोघ आणि सुप्रतिष्ठित आहे. बहुतेक ज्योतिषांचा धंदा, ह्याच ग्रंथावर चालतो.

देवीसिंह : तोड पण तोड काढलीस बुवा.

नारंभट : ब्राह्मणाच डोक आहे. चल सांगत चल, त्या पाटलाची माहिती. बोल त्याला मुले किती? भाऊ किती? बाप किती? चल, बोलत चल!

(जातात.)

प्रवेश २ रा

(कमलिनी एका झाडाखाली थोडी निजली आहे आणि किसन आणि शंकर तिला वारा घालून उठविताहेत.)

किसन : झोप लागली वाटते ताईला. किती धीराची पण?

शंकर : झोप कसली? उन्हाच्या तापाल आणि तहानेन तिला चक्कर आली आहे. काल पंढरपूरहून, अंगात किंचित् कसरे असता ती परत घराकडे निघाली, हीच चूक झाली. तहानेने व्याकूळे असता, ही हसतमुखान सगळे सोशीत आहे. किसन, पाहिलीस ना आता नदीवर झालेली दुर्दशा? चोखा म्हणतात की, स्पृश्य हिंदु लोक आम्हा महारादिकांस जे दूर ठेवितात, त्याचे एक महत्वाच कारण आमची स्वतःची गदळे राहणी, हे होय. आपण शुद्धपणाने आणि निर्मळे वर्तनाने राहू तर, स्पृश्य आपला तिटकारा करणार नाहीत. पण त्यांच्या या सात्विक कल्पनेत आणि प्रत्यक्ष व्यवहाराच्या कठोर घटनेत, केवढा फरक आहे, पाहिलंस ना? ह्या- ह्या कमलिनीइतकी आहार, विहार आणि विचार ह्यांत शुद्ध आणि सात्विकपणे राहणारी कुमारी, स्पृश्यांतही दुर्मिळच. तथापि ती महाराची म्हणून नदीवर जिथे सर्व लोक पाणी पीत, तिथे तिला मज्जाव झाला. प्रथम नदी टीचभर, त्यात जेथे काही स्वच्छ पाणी चुळक्यांनी भरता येईल तेथे स्पृश्य पाणी भरणार, त्याचे खाली धुणीबिणी धुणार. तेथून खाली गावची गुर पाणी पिणार आणि त्याच्याखाली, जिथून नदी बहुतेक सुकून खंडितच झालेली तिथे महारादिकांची पाणी पिण्याची जागा! तिथल ते डबक, त्यात वरून वाहत आलेल्या धुण्याचा आणि गुरांच्या घाणीचा मळ बुडाशी बसलेला आणि पाण्यावर गुरांच्या तोंडचा वहात आलेला आणि इतर घाणींचा फेस तरंगलेला! अशा या डबक्यातल पाणी एक दोन घोट घेते न घेते तो, तिला उन्मुळून आले. शेतकरी पाहत होता की ती तहानेने कासावीस झाली आहे. पण महारणी नेहमी तिथेच तर पाणी पितात हिलाच काय झाले उलटी व्हायला, म्हणून टोमणा मारून चालता झाला! अशा डबक्यास आमच्या महारवाड्याचे पाणवठे म्हणून आपणच पिढ्यान् पिढ्या नेमून द्यायचे; आणि नंतर आपणच उलट म्हणायचं- काय हो हे अस्पृश्य गदळे! बैल पिणार नाही; असे घाण पाणी पिण्याची ह्यांस खोड लागलेली. छेः ! छेः ! ह्या संताच्या सात्विक उपदेशाने आम्हा महारांस लोक, मनुष्य समजणार नाहीत. चित्रातल्या सरोवराल जशी, मला आता लागलेली तहान भागणार नाही, त्याच प्रमाणे या नुसत्या शीतळे संतोपदेशाने, आम्हा महारांचा पदोपदी होणारा छळ बंद पडणार नाही. त्याला दुसराचे काही तरी कडक उपाय योजिला पाहिजे-

कमलिनी : भाऊ, शंकर, मला पाणी हवे आहे.

किसन : हे बघ, येथून जवळच एक गाव आहे, तेथे माझ्या ओळखीची महारांची घर आहेत. वाटेत एक सार्वजनिक विहिर आणि फक्कड सदा-उडत कारंज पण आहे.

कमलिनी : कारंजे? अहाहा! भाऊ जर ते स्वच्छ थंडगार बिंदु, तसेच उडता उडता माझ्या या सुकलेल्या जिभेवर पडतील, तर एखाद्या चातकीच्या आत्म्यासारखा माझा आत्मा शांत होईल. पाणी! पाणी! चल, मी प्रवासाला भीत नाही. चल मी चलते त्या कारंजावर, चल

शंकर : थांब, तुझ्या अंगात किंचित् ताप आहे. हे वरतून भर ऊन. पाण्याकरिता आपण सगळेच कासावीस. गावापर्यंत तुला चालवीत कसे न्याव? ती बघ, एक गाडी येत आहे. पहातो यत्न करून. तो गाडीवाला पुढेच येतो आहे. (गाडीवाला शीळे वाजवीत येतो.) अहो पाटील, गाडी कुणीकडे चालली आहे?

गाडीवाला : चालली आहे. मायापूरच्या वाटेल.

शंकर : वा! उत्तम झाले, हे पहा आम्हा तिघा जणांना तुम्ही मायापूरापर्यंत घेऊन चलाल तर फार उपकार होतील. आमच्या या कमळीला ताप येत आहे. चक्करही आली होती. आम्ही तुमच भाडं घरी जाताच चुकत करू.

गाडीवाला : बसा तर गाडीत, मला अनायासेच भाडेकरी गवसला, त्यात उपकार कसला राव. (किसनच्या जवळ येताच त्यास पाहून) पण हा कोण? हा त्या मायापूरच्या जान्या महाराचा लेक नव्हे का? आणि हा महार गाडीत येणार माझ्या?

शंकर : मी पण महारच आहे.

गाडीवाला : नि धेडा माझ्या गाडीत बसून तू मिरवत जाणार होय मायापूरला! चेष्टा करतोस होय माझी? चाबकाखाली बडवीन, पुनः असा पाजीपणाचा प्रश्न केलास तर!

किसन : चेष्टा नव्हे. परंतु महार जरि झाला तरी त्यावर दया करूच नये, असे का आपला हिंदुधर्म सांगतो तुम्हाला-पाटीलबुवा, माझ्या बहिणीला, तहानेने आणि उन्हाच्या तापाल चक्कर येत आहे. तरी दया करा; आणि त्या पुढेच्या गावांपर्यंत तरी आम्हास, ह्या छायेच्या गाडीतून घेऊन चला. आम्ही भाडं जाताच देऊं. ही वस्त्रं पाहिजे तर गहाण घ्या, पण दया करा!

शंकर : ही, तुम्ही मघा म्हणालेत त्या जानबा नाईक महाराचीच मुलगी आहे.

गाडीवाला : (जात जात) हां, हां, जान्या महाराचा, जानबा नाईक झाला! तर मग,अशा थोरामोठ्या नाइकाच्या मुलीस माझ्या दीनाची गाडी शोभणार नाही. तिला एखाद्या राजाची पालखी भेटली, तर देतो हो धाडून!

किसन : अरे, पण तुझ्या गाडीला, बैल जोडले आहेत आणि ते बघ, तुझे कुत्रे तू सांखळीत त्या गाडीला बांधून, आत बसविल आहेस, आता ते तुझा हात. उन्हाल लवलवणाऱ्या जिभेल चाटीत होते; मग त्या बैलान तुझी गाडी बाटत नाही; त्या कुत्र्याच्या लाळेन हात बाटत नाहीत. मनुष्यांसारखे मनुष्य आम्ही महार, तुझ्या हिंदु धर्माचे हिंदु, आमच्या स्पर्शाने मात्र तुझी गाडी विटाळेल नाही? आपत्तीत देखील आम्ही दयेला पात्र नाही ना? आम्ही कुत्र्याहून देखील गलिच्छ आहोत नाही?

गाडीवाला : र माझे कुत्रे, तुम्हा महारभंग्यांप्रमाणे गावच्या मळाच्या पाट्या उचलीत नाही.

शंकर : केवळ तो मळ, स्वतःच मात्र खात असते, आणि मळाची पाटी म्हणशील तर आपल्या पोटाच्या पाटीत, तोच मळ भरभरून तू, ती आपल्या उरावर घेऊन आता देखील उभा आहेस.

गाडीवाला : धेडा, तुला भांडायचे तर त्या देवाशी भांड, की ज्याल तुला महाराच्या जन्माला घातले; आणि कुत्र्याच्या घातले नाही. माझे कुत्रे जसे मी त्या साखळीने गाडीस बांधून टाकले आहे; तसे देवानंच तुम्हा महारांस रूढीच्या साखळीने गांवच्या शौचकूपाला बांधून टाकले आहे, मी नाही. फोड त्या देवाच्या नावाने दगड! मी चव्हाण, माझ्या गाडीत धेडांना घेऊ? पायाचे खेटर डोक्यावर ठेवू?

(जातो.)

शंकर : (स्वगत) अरेरे! काय ही आमची दुर्गति! आमच्या डोळ्यांदेखत आमच्या स्त्रियांची विटंबना होते असता, आम्हास ती सहन करावी लागते. असे वाटते की ज्याने त्याने धिक्कारलेले हे काळे तोंड कमलिनीस दाखवू देखील नये. कमलिनी मनातून मला भ्याड समजत असेल. तिच्या प्रेमास पात्र असे पौरुष माझ्यासारख्या नुसत्या मिशांनी पुरुष बनणाऱ्या प्राण्यांत नाही असे पाहून मजवरील तिचे प्रेम कमी होते असेल!

कमलिनी : शंकर, तू कसल्या चितेत पडला आहेस? असा एकदम काळवंडलास का? अरे चल, मला गाडी नको नि काही नको. ही मी चालू लागले. ते गाव कोणते ते जवळच आहे ना ? मिळेल तिथे आपल्याला पाणी.

शंकर : कमळे, पण त्या पाण्याने माझ्या- आपल्या महारांच्या तोंडाला लागलेली, ही जन्माची काळोखी धुतली जाईल काय? महारांच्या जीवनात विटाळ धुऊन काढील असे पाणी भागीरथीच्या घाटावर देखील मिळणार नाही, मग इतर पाण्याची गोष्ट कशाला? खरोखर महार जातीत जन्म घेण्यापेक्षा, एखाद्या पशूचे जातीत जन्म घेणे ह्या आपल्या- आपल्या कसल्या! ह्या हिंदु समाजाचे दृष्टीने अधिक मानास्पद आहे. देवाने मला महाराचा जन्म का दिला?

कमलिनी : (हंसत) खरच का तुला महार झाल्याविषयी पश्चात्ताप होते आहे! आमच्या महारांत काहीहि आकर्षक वाटते नाही ना? नाही ना? बरे तर, चल रे भाऊ, आपण आपले महार तर महार! ज्याला आपण आकर्षक वाटते नाही, त्याचे गळ्यांत आपण कशाला उगीच लोढण्यासारखे लोंबकळत रहा?

शंकर : कमळे, ए कमळे, अग, तुला कोणी म्हटले, आकर्षक नाही म्हणून? माझ्या बोलण्याचा रोखच तुझ्या लक्षात आला नाही. कमलिनी महारांच्या जातीत ज्या अर्थी तू उपजली आहेस, त्या अर्थी तरी, त्याच जातीत माझा जन्म घालून देवाने मला तुझ्या संगतीचा लाभ मिळू दिला; म्हणून मी महार केल्याविषयी देवाचे आभारच मानतो. मी ते केवळ सार्वजनिक आणि सामाजिक दृष्टीन बोललो आणि तसे देखील आता पुनः बोलणार नाही. ये, माझे कमळे ते! चला जाऊ पुढे! (पुढे जाऊन पुनः दुसऱ्या उघडल्या पडद्यातून येतात.)

कमलिनी : किती दूर असेल रे ते गाव अजून, शंकर? मला किनई- अग बाई! (अंग टाकते.)

शंकर : अरे हिला पुनः चक्कर आली! कमळे! कमळे!

किसन : (वारा घालीत) काय पोरीची दशा झाली पहा! ताई, ताई माझी निरपराध ताई ती.

शंकर : किसन, तो बघ घोडेवाला येत आहे. कमळला आता असे चालविणे म्हणजे निष्ठुरपणाची पराकाष्ठा होणारी आहे. म्हणून म्हणतो; ह्याला युक्ती आहे की ह्या घोडेस्वारास, हिला घोड्यावर बसवून त्या गावापर्यंत नेण्यास विनवावे.

किसन : अरे विनवू वाटेल तितके. पण महारांस घोड्यावर बसणे निषिद्ध आहे ना? आपल्या हिंदूच्या सामाजिक रूढीप्रमाणे, पालखीत कोणी बसावे, हत्तीवर कोणी, घोड्यावर कोणी, बैलावर कोणी, रेड्यावर कोणी, उंटावर कोणी, कोणत्या वाहनावर कोणत्या जातील बसावे ते ठरलेले आहे. सर्व वाहन अशीच उच्च जातीपासून खालपर्यंत वाटून देण्यात येता येता, महारांच्या वाट्यास इतर वाहन संपल्यामुळे, त्यांच्या स्वतःच्या पायांची दुचाकी गाडी मात्र तेवढी उरली. तिथे घोड्यावर महारास घेणार कोण?

शंकर : तिथेच तर एक युक्ति करावी; की, आपण महार म्हणून सांगूच नये. ते सामानवाहू बाजारी तट्टू आहे. तो पहा घोडेवाला उतरून इकडेच येत आहे.

(घोडेवाला येतो.)

शंकर : दादा, राम राम! एक नम्र विनंती आहे. ही पहा, प्रवासात उन्हाच्या चटक्याल एकाएकी ही आमची कमलिनी चक्कर येऊन पडली आहे. पाण्याविना आमचे जीव सुकून गेले आहेत. तर या शेजारच्या गावापर्यंत त्या मुलीला घोड्यावर बसवून पोचवाल तर, आपले उपकार आम्ही विसरणार नाही. दया करा, तहानेच्या तीव्र वेदना तिला असह्य होते आहेत.

घोडेवाला : इतकेच ना? मग इतकी गयावया कशाला? तुमची मुलगी ती माझी मुलगीच आहे. चला कारंज्यावर तिला एकदा निर्मळे पाणी पाजून, त्या शीतल बागेत थोडी निजू दिली की आता ताजीतवानी होईल. बसू द्या तिला घोड्यावर.

किसन : देव तुमच कल्याण करो! चल कमलिनी, ताई! ऊठ बाळे, आता घोड्यावर बसून जायचे आहे. ऊठ आता पाणी येईल हो.

कमलिनी : (एकान्त) अरे पण भाऊ त्यांना आपण महार आहोत हे सांगितले का?

शंकर : आता कृपा कर आणि ते नाव काढू नकोस.

कमलिनी : तर मग शंकर, मला घोडा नको. मी अश्शी चालेन. पण, त्या गृहस्थास फसवणारे नाही. कोणी दुष्ट असता तर, एक वेळ फसवले असते, पण हा दयाळू पुरुष आपली कथा ऐकताच गहिवरला, याला कसे फसवावे? आणि मी महारीण आहे हे लपवावे तरी का? माझ्या आईबापांच्या पोटी आल्याची मला तरी लाज वाटते नाही. घोड्यावर बसण्यासाठी, मी माझ्या आईबापांना नाकारणार नाही.

किसन : हे दयाळू सज्जना! तू आम्हाला कोण काय ते न विचारता ज्या अर्थी शुद्ध मानवी दयेने साहाय्य करण्यास प्रवृत्त झाला आहेस; त्याअर्थी तुझी ती दया इतकी उथळे निश्चयाची नसेल; की आम्ही महार आहो हे ऐकताच तिचा निर्मळे ओघ एकाएकी सुकून जाईल.

घोडेवाला : तुम्ही महार आहा?

कमलिनी : होय महाराज, महार नसलेल्यांचे जीव उन्हांत पाण्याविना जितके तळमळतात, तितकेच महारांचेही तळमळतात, आमचे तळमळत आहेत.

घोडेवाला : विनयशील मुली, महार तर काय मनुष्यच आहेत; पण जीव जंतु देखील तहानेने मनुष्यांसारखेच व्याकूळे होतात, मनुष्यांसारखेच दयापात्र असतात; पण, काय करू? मी याच गावाचा उपाध्याय. महारांस घोड्यावर बसवून माझ्याच गावात नेईन तर तुम्ही ओळखले जाताच, लोक मला शेणमार करतील, माझी वृत्ति बुडेल. माझी बायकांमुले उपाशी मरतील!

कमलिनी : महाराज, आपण दाखविलेल्या सहानुभूतीने माझी अर्धी तहान तृप्त झाली. आपण काही एक संकोच करू नका. बरे झाले, मी आपणांस महार म्हणून सांगितले, नाही तर मजवर दया केल्याने, जर का आपल्या बायकामुलांचा तळातळाट झाला असता; तर आपल्या दयेचा झरा, माझ्या या कपटाच्या उत्पातात आटून गेला असता; आणि पुढे मागे कोणी अकपट सत्पात्र याचकही, त्या झऱ्यावर येऊन आपली तृष्णा तृप्त करू शकता ना. वंचित दया परदुःखाने पुनः द्रवेनाशी होते. यावे आपण.

घोडेवाला : उदार मुली. तुझ्या संकटात माझ्याकडून काहीच साहाय्य होते नाही. ह्या पापाच प्रायश्चित्त म्हणून, मी तुला हा दंड देत आहे. मानून घे. हे वीस रुपये तुला प्रवासात उपयोगी पडतील.

कमलिनी : वीस रुपये? छे महाराज, अग बाई गेला तो! काय दयाळू आहे बिचारा! चल शंकर, मला पुनः बरे वाटते आहे. चल, मला चालण्याचे इतके नाही कठीण जात. पण ते पाणी कधी पिईन असे झाले आहे. (जातात.)

प्रवेश ३ रा

(इब्राहिम येतो.)

इब्राहिम : लडकी होना तो ऐसी होना! हिंदूमधील अशी एखादी फटाकडी पोर जर मुझे पहिलेही मिलती, तो मै क्यौ मुसलमान होता? मुसलमान होऊन मला चार वर्षं झाली. पण मला अजून कुराणाच एक अक्षर तरी माहीत आहे का? मुसलमान बोलतात ती हिंदी भाषा देखील अजून मला बोलता येत नाही नीटशी. माझी मूळची जात हिंदु डोंब. पण हिंदु होतो तोवर मला ब्राह्मणापासून शूद्रापर्यंत तर काय, पण हे महार देखील, नीच नीच म्हणून हडहड करीत असत. ब्राह्मण तो शूद्र, महारांस हडहड करितात. महार, आम्हा डोंबाचे ब्राह्मण बनून अशीच कठोर छळणूक करणार. वरच्या वर्गांच्या तिरस्काराची लाथ जोराने त्यांच्या मस्तकावर बसताच, हे खालचे वर्ण, त्या जोराने उत्पन्न होणाऱ्या क्रोधामुळे, त्याहून अधिकच जोराने आपल्या लाथा आम्हा नीचतर वर्णावर झाडणार. हिंदुसमाजात अशी ही शिवाशिवीची आत्मघातके लाथाळी सारखी चालली आहे. हिंदुधर्माचे तात्विक स्वरूप काय असेल ते असो, पण ही शिवाशिवीची लाथाळी, हाच व्यावहारिक हिंदुधर्म होय, यांत काही शंका नाही. ह्या वरच्या लाथा खात आणि खालच्यांवर लाथा झाडीत, मला हिंदुधर्माची चीड आली आणि ही चीड हेच माझे कुराण. तेच काय ते वाचून मी मुसलमान झालो. माझी बहीण मला भेटावयास आली तो तेथील मुसलमानी मुख्याधिकारी सुभेदार बंगषखान, स्वतःच तिच्यावर भाळले- तिला पण मुसलमान केली आणि अशा रीतीने प्रत्यक्ष सुभेदाराचे आम्ही शालक झालो. - इतकेच काय, पण पांचपन्नास शिपायांचे आम्ही नाईक झालो! काम तरी कसे अगदी फक्कड मिळाल, जी जी हिंदूची सुंदर स्त्री सापडेल- ती ती सुभेदारांच्या चरणावर प्रथम अर्पण करायची आणि नंतर मशिदीत नेऊन तिला मुसलमान करायची. सुभेदारांस चळच लागला आहे हिंदु मुलींस हाताखाली घालण्याचा. पण आता ही पोर मात्र, हा पठ्ठ्या स्वतःच्या हाताखाली घालणार. कुंपणावर चोरून उड्या मारून, लोकांची फुले वेचण्यासाठी काट्यांनी सार अंग रक्तबंबाळे व्हावे आमचे ! आणि तोडलेल्या फुलांच्या माळेने गळा शोभिवंत आणि शीतल व्हावा ह्या आमच्या शालकांचा - ह्या सुभेदार बंगषखानाचा! छट् , आता ही पोर त्याच्या दृष्टीस पडू द्यायची नाही. त्या गंगाजीकडे, देवीसिंह म्हणतो तशी लपवून ठेवायची. मग तिला असे बलात्काराने आलिंगायचे. असे मान मुरगळून चुंबन घ्यायचे आणि ती रडते ओरडत असता, तिच्याशी राक्षसी विवाह लावायचा. अशा रीतीने मला ह्या जाफरअल्लीने शिकवलेले संस्कार, तिच्यावर शास्त्रोक्त पद्धतिने केले असता, ती मशिदीत जाऊन मुसलमान होण्यास सत्पात्र ठरेलच. तिथेच तिच्याशी लग्न लावून मग सुभेदारास कळवायचे की, आता आपल्या मेहुण्याच्या लग्नाप्रीत्यर्थ सुभेदारास शोभेल असा एखाद्या जहागिरीचा, आपल्या शालकास- या इब्राहिमखानास - अहेर करावा! हा आलाच देवीसिंह.

देवीसिंह : ठरले ना? कशीपण गांठली सावज?

इब्राहिम : मग धरूच का जाऊन आत्ता?

देवीसिंह : नको, नको. मघा आपण गुपचुप ऐकले त्यावरून हे, कारंज्यावर पाणी पिण्यासाठी जातील. इथे ह्या मुलीस धरलंस तर, सर्व हिंदुलोक तुझ्या नावाने ओरड करितील की, इब्राहिमन हिंदु मुलगी पळविली आणि आम्हास उघडपण साह्य देता येणार नाही. पण ते तिघे धेड कारंजावर गेले नाहीत तो तू त्यांना भेटून कारंजावर पाणी न मिळाल्यास बळाने जाऊन 'पाणी प्या' असे चिथीव. तू सरकारी मुसलमानी अधिकारी आहेस. त्यांचा पाठिबा करशील, असा त्यांना आधार दे. ते कारंज्यावर आले की, आम्ही त्यांस पाणी मिळू देणार नाही. ते बळाने पाणी प्यावयास गेले की, कारंज्यावरचे सर्व हिंदु लोक आपणांसारखेच त्यांच्यावर तुटून पडतील त्या धांदलीत मी तुला सरकारी अधिकारी म्हणून त्यांस धरावयास प्रार्थना करीन, म्हणजे तू धर. ह्या युक्तीन तुला हिंदु लोकांचा विरोध येणार नाही. इतकेच नव्हे तर उलट साह्य होईल. आणि मला आणि नारंभटांना ते, धर्मरक्षक म्हणून गौरवतील. चल, तू गांठ त्यांना आणि दे चिथावून. (जातात.)

प्रवेश ४ था

(किसन, शंकर, कमलिनी येतात.)

शंकर : आले पहा एकदाच ते गांव.

कमलिनी : पण आता दोन घोट तरी पाणी, मला ह्या पावली पाहिजे आहे. ते बघ कोणाचे घर-

किसन : चौकीदाराचे आहे. चल तिथे पाणी विचारू. हा बघ त्यांचा मुलगा आलाच पुढे; बाळा, आमचे जीव तहानेने कासावीस झाले आहेत, थोडे पाणी पाजतोस का?

मुलगा : हो, हो, थोडे का? पोटभर प्या! या आंत. थंड, खुज्यातल पाणी देतो या.

किसन : आत नाही येता येत आम्हाला. कारण, दयाळू कुमारा, आम्ही महार आहोत.

मुलगा : (जवळ येत) मग असाना. मी परवा मामाचे घरून गाडीत बसून आलो; तरी देखील, मला कोण तहान लागली! मग तुम्ही तर भर उन्हात पायी प्रवास करीत आहात; तुमचा जीव माझ्यापेक्षा किती तरी कासावीस होते असेल. महार झालेत म्हणून काय झाले?

कमलिनी : (हात पुढे करून) बाळा, देव तुझे कल्याण करो. असे वाटते तुझे तोंड कुरवाळावे! किती दयाळू आहेस.

पद १०वें

या बाळा मजला ।। ध्रु.।।

वाटे घ्यावे, कुरवाळावे, त्या प्रेमला, वदनाला ।। १ ।।

(मुलाची आई ओरडत येते आणि लाटण फेकून)

मुलाची आई : अग हडळी! ए लांवे! कुठली मेली ब्याद आली आहे! माझ्या बाळाच्या इतकी जवळ येऊन, त्याच्यावर सावली पाडण्याची लाज नाही वाटते तुम्हाला? मेल तोंडान चांगल सांगताहात की आम्ही महार म्हणून; आणि तरी माझ्या बाळाच्या अंगावर सावली पाडून, त्याचे तोंड कुरवाळू पाहाताहेत; मेले धेड. त्याच्या खेटराचे तोंड कुरवाळे! चल बाळे.

मुलगा : नको ग आई त्यांना असे टाकून बोलूस!

(ती बाई मुलास ओढून नेते.)

कमलिनी : किती दयाळू मूल ते, बाई.

शंकर : ती त्याची आई पण लहानपणी त्याच्यासारखीच दयाळु होती; असेल, आणि तेच मूल मोठेपणी तिच्याइतके निष्ठुर होईल. कारण दयेची आणि सहानूभूतीची अमृतलतिका, मनुष्याच्या मनात बालपणी अशी लुसलुशीत दिसत असते. तिला जातीच्या अहंकाराची विषारी कीड, शिक्षण आणि रूढि, हीच पुढे लागतात. कोमल वयापासून, महार हेही मनुष्यच आहेत; आपले हिंदु धर्माचे सख्खे भाऊ आहेत, त्यांचेवर दया करावी, असे शिक्षण जर स्पृश्य हिंदु आपल्या मुलांस देतील, तर त्यांना मोठेपणी महारास हात लावावा की न लावावा ही शंका देखील येणार नाही. पण-

कमलिनी : आता प्रथम पाणी, नि मग-पण चल ते कारंज आलंच ना? पण तिथेही आपणांस कुणी शिवू दिले नाही तर?

इब्राहिम : (प्रवेश करून) तर, बळाने घुसून पाणी प्या! तुम्ही महार झाला म्हणून तुम्हास पाणी मिळणार नाही काय? देव पाऊस पाडतो, तो काय सांगून पाडतो की, हे पाणी स्पृश्य हिंदूसाठी आहे म्हणून! मी दुरून आताच तुमचा छळ पाहिला. हे पहा, मीही पूर्वी एक हिंदु डोंब होतो. इतका नीच योनीतला की हे शूद्रादिक जसे तुम्हा महारांस झिडकारतात, तसेच, तुम्ही महार देखील आम्हास झिडकारीत होतात. असाच एक दिवस तहानेने कासावीस झालो! याच कारंज्यावर लोक मला मज्जाव करू लागले, मी तसाच वर घुसलो आणि 'अल्ला हो अकबर' म्हणून ओरडलो. ओरडताच मी मुसलमान ठरलो आणि मग, कारंज्यावर पाणी पिण्याचा तर काय, पण स्नान करण्याचाही अधिकार सर्वसंमत झाला. हे पहा, तुम्ही चला. मी ह्या पंढरपूरचा कोतवाल आहे. मी मुसलमान राज्यकर्ता आहे. तुम्ही प्या पाणी कारंज्यांच. मी पाहतो कोण आडवा येतो तो.

किसन : इतके निकरावर कशास या! कारंज्याचे नसल, गावात पुढे चार महारांची घर आहेतच, तिथे पाणी पिऊ.

शंकर : त्या मागच्या नदीच्या डबक्यासारखे मोरीच पाणी? नाही, मी तर ह्या कारंज्याचे हे स्वच्छ-अप्सरांच्या झऱ्यातून स्त्रवणारे मधुर पाणी पिणार. जगातील पाण्यावर माझाही अधिकार आहे.

(कारंज्याचा देखावा दिसू लागतो.)

कमलिनी : भाऊ आले रे आले कारंजं! कोण शीतल तुषार उडताहेत! अरे, एक तरी तसाच्या तसाच माझ्या जिभेवर पडू द्या रे!

किसन : (कारंज्यावरील पाणी भरणाऱ्या लोकांपैकी जाणाऱ्यास) वाटसरू आहोत आम्ही, कारंज्याचे थोडे पाणी आम्हास पाजाल का?

एक गृहस्थ : ते का? स्वतःच प्या की पोटभर. इथे सार्वजनिक कारंज एका उदार शेटजीने हेतूतः बांधल आहे. ती मुसलमानांची टाकी आणि तोट्या, ह्या हिंदूच्या; या आणि प्या.

किसन : पण आम्ही महार आहोत.

एक गृहस्थ : आणि इतके लगट येऊन उभे राहिला? काय म्हणाव तुम्हाला? (जातो.)

किसन : अहो दयाळू मायबाप! आम्हा महारांस कोणी पाणी पाजता का थोडे?

कमलिनी : अहो बाई, अहो आई,

पद ११ वे

पाणी द्या हो, आम्ही पतित, तरिहि तृषित,<br>
तळमळे, मीनासम प्राण हो ।। ध्रु.।।<br>
द्या बाई पाणी, द्या बाई पाणी,<br>
विनवी मी केविलवाणी । शपथ न होई हा ताण सहनची ।<br>
आम्ही जुळवू हात । ओता दुरून त्यांत, घोटभरी ।<br>
परि अदय हृदय व्हा आता तरी खचित असे आण हो ।। १ ।।

शंकर : अग, सोड ती विनवणी. यांची हृदयं दगडापेक्षाही कठीण झालेली आहेत. मुसलमान या कारंज्यावर पाणी पितात आणि आम्हा महारांना दुरून पाजण्याचा देखील ह्यांना विटाळ होतो! आम्ही

हिंदु ना? मग मूर्तिभंजक मुसलमान, मूर्तिपूजकांपेक्षा अधिक पवित्र वाटतो ह्यांना, म्हणायचा? चल मी पाजतो तुला पाणी.

देवीसिंह : (एकीकडे) ह नारंभट, काय पाहतोस. ओरड! जसा हवा तसा डाव पडला. ओरड, महारांनी पाणी बाटवले हो ! ओरड!

नारंभट : ओरडतो, बॉंब देखील मारतो. पण त्या मुसलमान इब्राहिमला तू कशाला इथे आणलेस?

देवीसिंह : तो नाही, तर त्या पोरीला धरून न्यायची आज्ञा कोण, तुझा बाप देईल? तो कोतवाल आहे.

नारंभट : पण तो मुसलमान आहे.

देवीसिंह : हो, आणि ती पोर सुंदर आहे. बोल, मुसलमानाच साह्य घ्यायचे नसेल; तर ती सुंदर पोर चालली हातची! का सोडू हा छंद?

नारंभट : नको नको छंद सोडूस! पण त्या छंदावर हा ह्या अरबी घोड्याचा चाललेला नाच तेवढा मला आवडत नाही.

देवीसिंह : अरे पण, त्याच्यावर स्वारी भरणारा मी आहे ना? त्याच्या हाती नाही पडू देत ती पोर. ह, आठव तिचे रूप! बघ, तिचे ते कमळासारखे विकटलेले डोळे! आणि मिटू देत तुझ्या धर्मबुद्धीचे ते पिचपिचीत डोळे. हूं!

कमलिनी : (शंकराला सावरीत.) नाही, त्यांच्या प्रामाणिक भावना, मी तुला बलात्काराने दुखवू देणार नाही. आपल्या दुःखाने कळवळून, त्यांचे कारुण्य जेव्हा द्रवेल तेव्हा, त्या पाण्यावरच मी आपली तहान भागवीन. तो पहा, कोणसा ब्राह्मण संध्या मध्येच सोडून आणि पाण्याची लोटी घेऊन आला बघ.

पुरुषोत्तमशास्त्री : बाई, पी पाणी, कर ओंजळे.

सर्वजण : पुरुषोत्तमशास्त्री, अहो हे काय? ते महार आहेत! तुमच संध्येचे पाणी-

पुरुषोत्तमशास्त्री : माझ्या संध्येचे पाणी त्या पतितास पावन करण्याइतके प्रबळे आहे! माझ्या गायत्रीचा मंत्र हा माझ्या हृदयाच्या कानठळ्या बसविण्याइतका कर्कश नसून, दयेचे संगीत, त्या हृदयाचे तारांतून स्वस्पर्शाने जागृत करील असा मंजूळे आहे. बैस मुली, हे संध्येचे पवित्र पाणी तुझ्या तहानलेल्या तोंडात ओतणे हेच आजच्या माझ्या संध्येचे आरंभीय आचमन होवो.

कमलिनी : भाऊ, शंकर, प्या तुम्ही प्रथम प्या.

किसन : वेडी कुठली! पी, तू पी. चल उरेल ते आम्ही पिऊ.

पुरुषोत्तमशास्त्री : अरे उरेल ते का, सर्व पोटभर प्या. मी संध्याकाळपर्यंत असा तुम्हास पात्रे भरभरून पाजीत राहीन. (कमलिनी ओंजळे करून पिऊ लागते.)

सर्व ओरडतात : पुरुषोत्तमशास्त्र्यांवर सावली पडली! अहो हा ब्राह्मण बाटला! महारांचे शिंतोडे उडाले!

नारंभट देवीसिंह : आणि हा पहा, तसाच कारंज्यावर जाऊन, तीच महारांच्या शिंतोड्याची आणि सावलीची लोटी बुडवीत आहे.

सर्व : पाणवठा बाटला! लोटी बाटली! अरे, बाटली! कोण बाटली?

(सगळा गोंधळ होतो.)

इब्राहिम : (पुढे येऊन) हां हां, क्या आरडाओरड चली है.

देवीसिंह : कोतवालजी! अच्छे आये आप, आमची फिर्याद है. ये महार हमारे कारंजावर बळाने जाके पानी प्याला. हमारी कारंजा बाटला. धरा या महारांना. आम्हा हिंदु लोकांच धर्मरक्षण करा! आपण राजपुरुष आहा!

इब्राहिम : समज लिया. अब चूप रहो. ए धेड लोक. तुम भी ठैरो. हम सब चौकशी करतो. प्रथम मला थोडी तहान लागली आहे.

(सर्व पुढे पुढे करीत.)

सर्व : फौजदारांना तहान लागली आहे? मी आणतो तांब्या भरून. हा घ्या माझा तांब्या. माझा घ्या. हा अगदी स्वच्छ आहे.

इब्राहिम : हम खुद जाके पानी पितो.

सर्वजण : फौजदार स्वतःच पाणी पीत आहेत, वाट द्या. ही, ही मुसलमानांची तोटी. प्याव पाणी. इब्राहिमखान फौजदार मोठा न्यायी मनुष्य आहे. असे मुसलमानांत न्यायाधिकारी अजून निघतात; म्हणून हिंदुधर्माचे रक्षण होते आहे - मुसलमान हिंदुधर्म रक्षक आहेत.

शंकर : किसन, कमलिनी, पाहिलीत ही आम्हा हिंदूची दुर्गति! मला तर, हिंदूस 'आम्ही' म्हणण आणि आम्हास 'हिंदु' म्हणण, याची सुद्धा लाज वाटू लागली आहे. हा डोंब मुसलमान होताच खानसाहेब झाला. तो कारंज्यावर पाणी पीत आहे, पाय धूत आहे आणि आम्हास, दुरून दोन घोट पाणी प्यावयास, निषेध होतो. कारण आम्ही मुसलमान झालो नाही. अजून हिंदुच राहिलो. मला असे वाटते की, यापुढे आपण हिंदुसमाजावरच आपली सावली टाकण सोडून देऊन कुठे तरी दुसरे घर पहावे.

कमलिनी : हरि हरि! शंकर, हे काय म्हणालास? त्या निर्दय शुचिर्भूतपणाने, ती दयेच्या पाण्याची धार, माझ्या तृषित ओठापासून मघा हिसडून नेली; तेव्हा, जितका माझा जीव व्याकूळे झाला नाही, तितका या तुझ्या तप्त शब्दांच्या आगीची धार, माझ्या कानात ओतणारी ही तुझी अशुचिर्भूत दया, माझा जीव व्याकूळे करीत आहे. माझ्या प्रियकर सवंगड्या! आपण हिंदुच आहोत! आणि 'हिंदु' आपले आहेत! हिंदु धर्माचे आपले पूर्वजार्जित घर सोडून, आपणांस दुसरे घर पाहणे असेल तर ते एका नरकाविना अन्यत्र कुठेही मिळणार नाही.

इब्राहिम : अच्छा, आव सब ऐसे. पांव पूछनेको रूमाल है?

सर्व : हो. हो. हे धोतर फौजदारांचे पाय पुसायचे आहेत, ही माझी छाटी, सोवळ्यातली आत्ताच धुतली. (इब्राहिम छाटी घेऊन हात पाय पुसतो.)

इब्राहिम : क्या देवीसिंह, क्या हुवा!

देवीसिंह : जनाब, या धेंडांनी हिंदूच पाणी बाटविल, हिंदु धर्मास शिव्या दिल्या.

इब्राहिम : इतकेच! उसमे क्या! हिंदु धर्मको हम भी शिव्या देतो.

गृहस्थ : हां जी! परंतु आमची प्रार्थना आहे की, आपण मुसलमान आहात, हिंदु धर्मास नाव ठेवणे - मुसलमानांचा धर्मच आहे. मुसलमानांनी राज्यं केली आहेत, महारांनी कधी राज्य केले आहे का!

इब्राहिम : अच्छा, हे तिघे मुसलमान झाले, तर मग पाणी भरू द्याल इथे?

सर्व : हां जी. अर्थातच भरू देऊ. पण हे हिंदु महार आहेत तोवर ह्यास पाण्यास कसे शिवू द्यावे! आपण न्यायी आहात. ह्यास पाण्यास शिवू देऊ नये.

इब्राहिम : (स्वगत) खरोखरच देवाने ह्या हिंदु लोकांचा नाश करण्यासाठी प्रथम यांची बुद्धि आंधळी करून सोडली आहे. महार 'हिंदु' आहेत तोवर, आम्ही त्यांस पाणी भरू देणे वा शिवणे, अधर्म समजतो. पण जर ते मुसलमान वा किरिस्तांव होतील तर, त्यांस पाणी भरू देऊ-शिवू-सन्मानाने वागवू- तो आमचा 'हिंदु धर्म' आहे. या त्यांच्या वाक्यातील प्रत्येक अक्षराच्या आघाताखाली, या अस्पृश्यांना हिंदु धर्मास बांधून टाकणाऱ्या, प्रेमाच्या आणि भक्तीच्या साखळीचा एक एक दुवा, खाड खाड तुटत चालला आहे. (उघड) अच्छा, या खटल्याची चवकशी आम्ही पंढरपूरच्या चावडीवर करणार, देवीसिंह, और तुम लोक, और तुम दोनो धेड, हमारे चौकीपर चलो और इस लडकीको भी चौकीके उप्पर हम घेऊन जातो.

शंकर : आम्ही तिघ एकदम चावडीवर येऊ. आमच्या या स्त्रीला आम्ही एकटी तुम्हाबरोबर धाडणार नाही.

इब्राहिम : क्या बोलता! बदमाश.

देवीसिंह, इतर : आज्ञा तोडतोस सत्ताधिकाऱ्यांची! उर्मट पाजी.

इब्राहिम : देवीसिंह, पकडो वो लडकीला, और तुम सब लोग बांधके ले जावे दोनो धेडांना. हम शिपाई अबी धाडता है. पकडो, नाही तर सुभेदारको तुम मेरेकू साह्य दिले नाही म्हणून सांगून तुमारी घरंदार जप्त करायेंगा भी! सुना? पकडो. (देवीसिंह, इतर काही लोक 'पकडो, बांधो' असे ओरडत, कमलिनीस ओढतात. शंकर आणि किसन भांडू लागतात. पण त्यास धरून बांधतात आणि कमलिनीला नारंभट घेऊन जातो. ती जाता जाता 'भाऊ शंकर, अरे धावा, मला सोडवा, शंकर' म्हणून ओरडते. या सर्व धांदलीत इब्राहिम निघून जातो.)

प्रवेश ५ वा

(संभाजीराव पाटील बोलत येतात.)

संभाजी : माझ्या आयुष्याच्या या उतरणीवरच्या प्रवासात माझ्या जीवनास एकमात्र आधार झालेली, ही माझी मालिनी, एवलीशी द्‌वितीय पत्नी, थोडीशी दृष्टीआड झाली तरी मला कसे ते चैन पडत नाही. आताच तिला सोडून आलो पण पुनः आत जावंस वाटते. (दार वाजवितो.)

मालिनी : हे काय पुनः कशाला परतायचे?

संभाजी : अग मघा तू माझे पाय रगडून थकली असशील, आता मी तुझे पाय रगडू का?

मालिनी : इश्श, हे असे उलटे काय करायचे?

संभाजी : वेडे, प्रथम विवाहाच्या पत्नीचे पाय रगडू नयेत खरे, पण या संभाजीराव पाटलाची मालिनी, दुसरी-आवडती-कोवळी-लुसलुशीत बायको आहे. पहिल्या लग्नाची बायको, ही नवऱ्याची मुलगी किंवा नात शोभण्याइतकी लहान नसते. म्हणून प्रथम पत्नीला पाहून केवळ पतिपत्नीत्वाच 'विषयी प्रेमच' उत्पन्न होते. शास्त्रात, पतीने पत्नीचे पाय रगडू नयेत म्हणून सांगितली ती आज्ञा, तेथे लागू पडते. परंतु द्‌वितीय विवाहाच्या मुलींना पाहून मनात नुसती 'पत्नीविषयक' प्रीतिच उत्पन्न होते नाही. ती द्‌वितीय संबंधाची पत्नी, आपल्या मुलीसारख्याच वयाची बहुधा असल्याने, तिला पाहून, वराचे मनात वात्सल्यभावही उत्पन्न होतो. तुला पाहून माझ्या मनास, पत्नीविषयक सत्ताभावापेक्षा, वात्सल्याचा सेवाभावच द्रववितो. लहान मुलांप्रमाणे तुला हसवावे, खेळवावे, असे वाटू लागते, म्हणून मी तुझे पाय रगडावयास काही हरकत नाही. अग, तृतीय विवाहासंबंधी तर असे सांगतात की, ती वधू आपल्या नातीच्या वयाची असल्याने तिला, नातीसारखी कडेवर घेऊन देखील हिंडावयास हरकत नाही. घेऊ का तुला कडेवर? वात्सल्यरस माझ्या हृदयात कसा अगदी भरून येत आहे. करू तुझे लाड?

मालिनी : पुरे मेले हे तुमचे लाड. लाडच करायचे तर आता पतीसारखे तरी काही लाड करावेत. वात्सल्याचे लाड माझ्या आईबापांनी पोटभर केले आहेत. लाडांनी मनाच समाधान होईनासे झाले म्हणजे तर मुली लग्न करतात. म्हटले नुसत गावच पाटलीणपण मजकडे आहे, असे म्हणून चालते नसत. पाटीलपणास शोभेसा आता काही पुरुषार्थ गाजवावा. तरच मी पाटलीणबाई झाल्यासारखे, काही फळे हातांत पडेल. नुसत पाय रगडीत बसून माझा वेळ नाही जात. एखादा पुराणिक ठेवावा म्हटले, तर तो देखील अजून ठेवणे होते नाही.

संभाजी : अग, विसरलोच तुला सांगायचे. एक विद्‌वान् पुराणिक आणण्यासाठी, कालच मी देवीसिंहास अगदी तातडीने धाडले आहे.

मालिनी : पण पुराणिक, नुसता विद्‌वान् असून काही एक भागायचे नाही. तोंडात तंबाखूच्या बुकण्या भरीत, नाकात तपकीर ओढीत आणि दात पडलेल्या तोंडातून उडणाऱ्या थुंकीने लडबडलेले, संस्कृत श्लोकांचे कर्कश आलाप चघळीत, स्त्रिया पापयोनि आहेत, रत्ने दगड आहेत, सोन माती आहे आणि भोग रोग आहेत, असे रडगाणे गाणारा पुराणिक, कितीही विद्‌वान् असला तरी, तो मला नको आहे. तो असाच एक मागे आणलेला होता, तसाच येणार असेल, तर मी त्याचे तोंड देखील पाहणार नाही.

संभाजी : छे, छे, तसला कुठला आणतो मी! ज्याचे तोंड तुला घटका घटका पहावेसे वाटेल, असा रसिक, काव्ये आणि कथा सांगणारा एखादा पुराणिक ठेवतो बरे. तुला दाखवून ठेवीन, मग तर झाले? बाळे ते माझे! (घेऊ लागतो.)

मालिनी : पुरे झाला म्हटले ना तो वात्सल्यरस! बाळे काय? आता मला दुसऱ्या कुणाला तरी 'बाळ' म्हणावेसे वाटू लागले आहे. कळले का?

(देवीसिंह येतो.)

देवीसिंह : राम राम, पाटील.

संभाजी : या, या मला तुम्हीच पाहिजे होतात. पुराणिक सापडला का?

देवीसिंह : नाही हो अजून! पण एक ज्योतिषी कुणी गावात आला आहे. त्याची लोक मनसोक्त स्तुति करीत आहेत. परंतु माझा ज्योतिषबितिशावर मुळीच विश्वास नसल्याले मी त्याला सांगता येत की नाही, विचारले नाही.

संभाजी : ती तुम्ही चूक केलीत. ज्योतिषी आणि पुराणिक असा उभय कलाभिज्ञ मनुष्य जर मिळेल तर माझ्या पत्नीची आणि माझी दोघांचीही करमणूक करू शकेल. अहो, ज्योतिषावर विश्वास का नाही म्हणता? ज्योतिषाचे अडाखे किती बरोबर असतात, ते तुम्हास सांगितले तर तुम्हास खरे देखील वाटणार नाही.

देवीसिंह : अगदी खरे.

संभाजी : माझ्या प्रथम विवाहाची पत्नी वारून मी दुसरे लग्न करीन हे भविष्य एका ज्योतिषाल केले होते, ते तंतोतंत बरोबर उतरले. का यांत तुम्हाला फारसे आश्चर्य वाटते नाही? ते भविष्य केव्हा केले होते, हे तुम्हाला माहीत आहे? माझ्या जन्मापूर्वी! ह! आता आश्चर्य वाटले! पण महाराज, महदाश्चर्य ते पुढेच आहे. ते माझ्या जन्मापूर्वी कोणाचा हात पाहून वर्तवले होते, माहीत आहे? माझ्या आजीचा!

देवीसिंह : म्हणजे? तुमच्या आजीचा हात पाहून सांगितले की तुला एक नातू होईल, त्याचा प्रथम विवाह होईल, ते कुटुंब निवर्तेल, तो दुसरे लग्न करील.

संभाजी : आणि ती दुसऱ्या लग्नाची पत्नी त्याच्यावर- म्हणजे माझ्यावर अत्यंत प्रीति करील! हे सर्व भविष्य माझ्या जन्मापूर्वी! आजीचा हात पाहून!

देवीसिंह : मग मात्र आश्चर्य आहे खरे! आणि हे खरे ठरले अगदी शेवटच्या अक्षरापर्यंत?

संभाजी : तर! सांगितल्याप्रमाणे जन्मलो, विवाह केला, ती वारली, दुसरा विवाह झाला आणि या तुमच्या नव्या पाटलीणबाई, द्रौपदीने धर्मावर केले नसेल, इतके प्रेम आज माझ्यावर करीत आहेत. ईश्वर करील तर काय होणार नाही?

नारंभट : (प्रवेश करून) ईश्वर करील तर काय होणार नाही, असा भाव ज्या धर्मात्म्याचा आहे, त्या तुमच ईश्वर कल्याणच करील.

संभाजी : या, बसा असे. आपण कोण?

नारंभट : मी एक ब्राह्मण आहे. लहानपणी ज्योतिषाचा अभ्यास केला. पुढे वेद शास्त्र पुराणांत पारंगतता मिळवली, जे ईश्वरावर विश्वास ठेवितात, त्यांचेच घरी काळ कंठावा असा परिपाठ आहे. आपले तोंडचे वरील ईश्वरनिष्ठेचे शब्द ऐकून दोन शब्द बोलावे म्हणून मी आलो. आपण धर्मात्मे आहांत.
संभाजी : छे! छे! कोण म्हणतो मी धर्मात्मा?
नारंभट : ज्योतिष. ज्योतिष म्हणत तुम्ही धर्मात्मे आहात म्हणून. हे पहा पाटील, विनयान इतरत्र आपण 'छे छे' म्हणाव. पण ज्योतिषांना अंतःकरणाचा ठाव माहीत असतो. त्यांचेसमोर सत्य तेच बोलावे.
संभाजी : तर मग आपणांस माझी माहिती ज्योतिषाच्या बळावर कळली? मग यापूर्वीच इकडे येऊन आम्हास उपकृत का केले नाही?
नारंभट : तुमच्या घराचा शोध करीत होतो आज चार पांच दिवस.
देवीसिंह : वा! ज्योतिषीबुवा, तुम्हाला पाटिलबुवांच्या अंतःकरणातील भुयाराच्या, कोठड्यान् कोठड्या, ज्योतिषाच्या विद्युद्दीपाल दिसू शकल्या, आणि भर राजमार्गावर असलेला आणि ह्या पंढरपूरच्या जन्मांधासही माहीत झालेला, हा ह्या पाटलांचा टोलेजंग वाडा दिसू शकला नाही? भूत, भविष्य, वर्तमान जाणणारा तो तुमचा ज्योतिषाचा वाटाड्या, तुम्हास हे घर नाही दाखवू शकला?
नारंभट : (स्वगत) काय गाढव आहे हा! मी सांगितले होते की, तू लेच्यापिच्या शंका ज्योतिषाविरुद्ध घे आणि मी त्यांची उत्तर देतोच, आपल्या चुका मान्य कर, म्हणजे या पाटलाचा मजवर अधिकच विश्वास बसेल. पण असल्या निरुत्तर शंका काढून मला, आयत्या वेळी निरुत्तर करीत आहे. केवळ गंमतीसाठी, मला तोंडघशी पाडण्याची याला पहिलीच खोड आहे. बरे, संधि साधून याला आपला थोडासा हात दाखवलाच पाहिजे. (उघड) अहो, मनुष्याच्या जन्मकालावरून, मुद्रेवरून नि हातावरून त्याची पत्रिका करिता येते. पत्रिकेवरून इतिवृत्त सांगता येत. पण गावाची का कोणी भौगोलिक पत्रिका करीत असतो? गावास मुद्रा नाही, हात नाही, म्हणून ग्रामाच वृत्त व्यक्तिवृत्ताच्या मार्गाने जाणता येत नाही. इतर मार्गांनी सांगता येईल की गावांत गल्ल्या किती, घर किती, नाले किती, पाजी लोक किती, त्यांची नाव काय (देवीसिंहाकडे बोट दाखवून) सांगू एखाद दुसरे नाव त्या पाजी माणसातले?
देवीसिंह : नको, नको, काय करायचे! आमचा विश्वास आहे आपल्यावर. आता थोडा पाटलांचा हात बघता का? कृपा करा तेवढी. आपल्या श्रमानुरूप दक्षिणा देण्यात येईल, हे सांगणे नकोच!
नारंभट : काय दक्षिणा! आणि तिच्यासाठी माझ्या ज्योतिषज्ञानाची विक्री करू? चाललो मी.
संभाजी : असे नव्हे, असे नव्हे, शास्त्रीबुवा, क्षमा करा. केवळ उपकार करण्यासाठी आमचा थोडा हात बघा. हे पहा देवीसिंह, बघितलंत ना ज्योतिषी खरा असला म्हणजे कसा निःस्पृह असतो तो?
नारंभट : ठीक आहे, दाखवा हात. (हात पहात) आपल्यास मातुश्री दोन बाप एक, सख्खा (देवीसिंह हसतो) हसता काय? अहो, काही मराठ्यांत पुनर्विवाह होतात आणि पहिल्या घरची मुले घेऊन, बायको आपल्या दुसऱ्या नवऱ्याच्या घरी नांदावयास येते. अशा मुलांस सावत्र बाप असू शकतो. मला लटपट करायची नाही. ज्योतिषविद्या जशी निर्मळे सत्य, तसेच आमचे सांगणे निर्भीड सत्य.
संभाजी : काय देवीसिंह, चांगलीच शोभा करून घेतलीत!

नारंभट : भाऊ तीन, मेले तीन. उरलांत तुम्ही एकच. विवाह एक होऊन गेला. अपत्य नाही. प्रथम पत्नी मृत. दुसरा विवाह झाला आहे. स्त्री सुंदर, तरुण, आपल्यावर अतिशय प्रीति करणारी, विश्वास टाकण्यास सर्वथैव योग्य.

संभाजी : (मान डोलवीत) तंतोतंत अक्षरशः!

देवीसिंह : खरच का संभाजीराव? तर मग, ज्योतिषीबुवा, आजपर्यंत भविष्य वर्तावयाच्या शास्त्रावर असलेला माझा अविश्वास आपण अगदी डळमळून टाकलात.

संभाजी : शास्त्रीबुआ, देवीसिंहाचाही हात आपण पहावाच. छे छे, एवढी कृपा कराचे! देवीसिंह, दाखविलाच पाहिजे तुम्हाला हात.

देवीसिंह : बरे बुवा, दाखवतोच आता यांना हात!

नारंभट : मीहि घेतोच बघून आता तुम्हाला (देवीसिंहाचा हात घट्ट धरून) आई एक, बाप दोन, एक सावत्र, एक सख्खा.

संभाजी : (हसत) भले सिंगजी, बोला आता खरे की खोटे?

देवीसिंह : पकडले बुवा, होते खरे असे. आमच्यात स्त्रियांचे पुनर्विवाह होतात खरे. (स्वगत) काय भटुरडा पाजी आहे.

नारंभट : बहिणी दहा, पांच मेल्या, चार जिवंत, एक जिवंत असून मेल्यासारखी.

संभाजी : म्हणजे काय देवीसिंह?

देवीसिंह : ते ज्योतिषीबुवांसच विचारा. ज्योतिषाला नक्की काही कळले नाही की ते अशीच गौडबंगाली भाषा वापरतात.

नारंभट : असे काय? ऐका तर स्पष्ट. ही रेघ पहा. बहीण जिवंत असून मेल्यासारखी म्हणजे, तुमची एक बहीण गणिका आहे. असे चपापता काय? ज्योतिष म्हणजे ज्योतिष.

संभाजी : काय देवीसिंह?

देवीसिंह : आहे खरे. (स्वगत) काय करू रे नाऱ्या! आता तुझे सांगणे खोटे म्हणू तर, या पाटलाची मालिनी आणि त्यांच्या त्या मावशीची सुवर्णमालिनी, दोन्हीही घबाडे हातची जातात! ज्योतिषी खरा म्हणून, या पाटलाचा या भटावर विश्वास बसलाच पाहिजे. म्हणून आपल्या आईबापांचे असे धिंडवडे करून घ्यावे लागते आहेत. (डोळे वटारतो)

नारंभट : वाईट वाटू देऊ नका! ज्योतिष आधी विचारू नये, विचारले म्हणजे चिडू नये. ऐका. वडिलांचे दिवाळे निघाले होते म्हणून तुमच बालपण उनाडक्यात गेले! तारुण्य उल्लूपणात, खरे आहे की नाही, बोला?

देवीसिंह : खरे आहे. (स्वगत) काय करावे कसे अगदी पेचात धरले आहे गुंडाने! चोर.

नारंभट : हो, हो, चोरी? आजाने चोरी केली होती. तुमचा पणजा फार सज्जन असे. दारू अतिशय प्याल्याने मेला.

संभाजी : काय देवीसिंहजी?

देवीसिंह : पकडले खरे, हातातच हात गवसला आहे त्यांच्या. (स्वगत) असे वाटते की एका लाथेसरशी खाली पाडावा. (उघड) बरे शास्त्रीबुवा, आता भूतकाळ पुरे झाला.

संभाजी : आता थोडा वर्तमान काळ आणि भविष्य काळ.

नारंभट : वर्तमान? वर्तमान भुतापेक्षाही भयंकर असतो केव्हा, केव्हा! ऐका! या पाटलाविषयी म्हणजे त्यांच्या विषयाच्या ठायी, तुमचा फार लोभ आहे.

संभाजी : अगदी खरे, माझे ते विश्‍वासू मित्र बनत चालले आहेत.

नारंभट : तुम्हास गृहसुख कमी आहे. तुमच्या सध्याच्या बायकोशी, तुमच्या नोकराची काही देवघेव चालली आहे.

संभाजी : काय सिंगजी?

देवीसिंह : खरे आहे ते. मी पैसेबिसे घरातच स्वाधीन केलेले आहेत. त्याच सगळी व्यवस्था पाहतात. ती पैशाची देवघेव आहे खरीच. ह आता पुरे शास्त्रीबुवा फार तसदी झाली आपल्याला. ज्योतिषाच्या सत्यतेविषयी माझी पुरेपुर निश्‍चिंति झाली. (हात हिसकावू लागतो.)

नारंभट : थांबा, भूत आणि वर्तमानाची चुणूक संपली. आता भविष्याची चुणूक. आपल्या पत्नी सध्या गर्भवती आहेत.

संभाजी : मग पुत्रप्राप्तीच आहे ना?

नारंभट : हो, पण तो पुत्र त्यांच्या ओळखीच्या एका पुराणिकाच्या-

देवीसिंह : (स्वगत) अरे हा रांडेलेक आता काय म्हणतो तरी काय? काय मारू लाथ आणि उखडू ती जीभ?

नारंभट : त्या पुराणिकाच्या तोंडवळणावर, अंगवळणावर, अगदी त्याच्यासारख्याच.

देवीसिंह : (नारंभटाच्या बोलण्यात बोलणे मिळवीत) अगदी खरे. पुरे पुरे, पटली निश्‍चिति. दक्षिणा घ्या ही. पण -पाटलांच्या पुत्रप्राप्ती विषयी काही सांगावे. (हात हिसडतो.)

नारंभट : पाटलांच्या पुत्रप्राप्तीविषयी सांगावयास त्यांच्या पत्नीचा हात पहावा लागेल.

देवीसिंह : आणि मला पुत्रप्राप्ती होईल, हे माझे हातावरून कसे कळले?

संभाजी : आली पुन्हा शंका ?

नारंभट : मी करतो पुनः समाधान त्यांचे. शास्त्राचा साधारण नियम असा आहे की, ज्या मनुष्यावर स्त्री अनुरक्त नसते; त्यांची संतति स्त्रीचे हातापेक्षा त्याच्या हातावर अधिक विश्‍वसनीयपणे अंकित झालेली असते. पाटलांची पत्नी सुंदर, तरुण, आणि तरीही त्यांच्यावर अनुरक्त आहे, म्हणून तिचेच हातावर, पुत्र किंवा कन्या, ते पाहिले पाहिजे. परंतु तुमच्यासारख्या ज्या मनुष्याची पत्नी दुर्दैवान त्याच्यावर अनुरक्त नसते-

देवीसिंह : (त्याच्या शब्दांत शब्द मिळवीत) संभाजीराव, शास्त्रीबुवा खरे खरे! बाई महाराजांचाच हात पहावा.

संभाजी : आमच्या कुटुंबाचा हात पहावाच. कोण आहे रे तिकडे? राम्या जा आणि पाटलीणबाईंना म्हणाव, इकडे जरा बोलावले आहे.

राम्या : (पडद्यातून) त्या म्हणतात, आत्ता मी साफ येत नाही.

संभाजी : (स्वगत) अरेरे, या वेळेला तरी निदान असले उत्तर तिने द्यायचे नव्हते. (उघड) पोथी वाचीत असाव्यात. ईश्वरचिंतनात एकदा गुंग झाल्या की, काही सुचत नाही त्यांना. राम्या त्यांना सांग, एक शास्त्रीबुवा आले आहेत, पोथी संपताच यावे.

राम्या : (पडद्यातून) त्या म्हणतात, तर मग मी आलेच.

नारंभट : (स्वगत) उत्तम शकून (कपडे सावरतो.)

मालिनी : (प्रवेश करून) काय आज्ञा आहे?

संभाजी : नमस्कार कर शास्त्रीबुवांना! आजपर्यंत असा ज्योतिषी मी पाहिला नव्हता. दाखव बरे त्यांना हात.

नारंभट : (प्रथम बोटे धरून मग मनगटापर्यंत रेषा पाहून) बाईंचा गेला जन्म ब्राह्मणकुळात. पुराणांची फार आवड. काशीला गेल्या जन्मी मृत्यु घडला; म्हणून ह्या जन्मीही देवादिकांच्या कथांची फार आवड. (स्वगत) अहाहा! हात काय मांसल आहे! रात्री अंधेरात देखील अशा हाताला धरले असता; त्या वरील रेषा न पाहताच, पुढे काय घडेल ते सांगता येईल. पण वर्तमान काय सांगू! गेला जन्म झाला; पण हिच्या ह्या जन्माविषयी देवीसिंहास काही वृत्तान्त विचारून घ्यावयास विसरलो. (उघड) मनगट बघू. वा? पुत्रप्राप्ति! इतकेच नव्हे, तर बाईंचा पुत्र पराक्रमी निपजणार!

संभाजी : तुमच्या तोंडात साखर पडो! आमचे वंशात पराक्रमी पुरुष विजयानगरच्या साम्राज्यापासून निपजत आले; ते आजपर्यंत. आता महापराक्रमी निपजावयास पाहिजे. महापराक्रमी म्हणजे कसा, शास्त्रीबुवा?

नारंभट : वडिलांहून सवाई.

मालिनी : इश्श इतकेच ना? म्हणजे काहीच नाही! शून्याची सवापट म्हणजे शून्यच.

नारंभट : पण ही रेषा पहा! वा! (दंडापर्यंत धरतो.)

देवीसिंह : शास्त्रीबुवा, दंडापर्यंत रेषा असतात की काय?

नारंभट : तळहाताच्या रेषा पाहून; पुत्र तळहाताच्या फोडाप्रमाणे लाडका होईल की नाही, इतकेच कळेल. परंतु तो शूर होईल की नाही हे पहावेयास दंडाच वळण पाहिले पाहिजे. कारण शौर्याचे स्थान दंड आहे. काय हे सूक्ष्म वळण ह्या रेषेच. (दंड अगदी लगटून धरतो,) अगदी राजयोग. पाटील, तुमचा मुलगा अगदी राजयोगी होणार. बाई धन्य तुमचा कुसवा. (स्वगत) अहाहा! ह्या हातावरच्या रेषा अगदी नदीचा उगम शोधीत, हिच्या लावण्यप्रदेशात माझा हात शक्य तितका वर गेला आहे. आता पुढे जी ही लावण्याच्या सुवर्णमेरूंची रत्नशिखर दिसताहेत, त्यांना चढून जाण्याची; केवळ हस्तसामुद्रिकाची छाती नाही. हाताप्रमाणे जर सर्व देहावर रेषा ओढलेल्या असत्या तर ती जाळीदार शोभा मला ह्या वेळी किती उपयोगी पडली असती! हातावरच्या रेषा नदीच्या वळणावळणांनी उतरत सौंदर्याच्या मानस सरोवरापर्यंत जाता आले असते. एक धाडस करतोच तर आता. (उघड) बाई, थोडी मान वर करा, आणखी थोडी, संभाजीराव पाहिलीत ही रेखा! (हनुवटी उचलून) बघा ते सूक्ष्म वळण कंठावरील. बाई, निःसंशय राजमाता होणार! अहाहा!

संभाजी : मी तुमचा अत्यंत आभारी आहे.

मालिनी : पण भावी वीरमातेला आणि राजमातेला योग्य, असे शिक्षण मला एव्हापासून देण्यासाठी, कोणी वसिष्ठ वा धौम्य यांच्यासारखा कुलगुरू कुठे आहे?

संभाजी : हा इथे! शास्त्रीबुवा माझी एक विनंती मान्य केलीच पाहिजे आपण. वेदशास्त्र, पुराणांत आपण पारंगत आहात म्हणून आपणच म्हणालात; तर आजपासून आमच्या इथे, राजमातृपदाला योग्य, त्या त्या वीरकथा आणि राजकथा, आपण आमच्या पत्नींना सांगाव्यात. आपण आमचे कुलगुरू. काय मालिनी, शोभतात ना हे!

मालिनी : मला काय शोभायचे?

संभाजी : अग त्या भावी पुत्राला शोभतातना कुलगुरू? ठरले तर, मालिनी जा. मावशीला सांग की, आजपासून यांच पुराण नियमितपण ऐकायचे आणि कुलगुरूंप्रमाणे यांचा आमच्या घरात सर्वांनी सन्मान ठेवायचा.

मालिनी : नमस्कार करते.

नारंभट : सुतवती भव!

मालिनी : (जाता जाता स्वगत) असल्या समर्थ पुराणिकांनी मनापासून दिला असेल तर; हा आशीर्वाद का नाही सफल होणार!

नारंभट : बरे आहे. आम्ही आता देवदर्शन करावयास जाऊन मग येतो.

संभाजी : जशी कुलगुरुंची इच्छा. देवीसिंह, यावे आता तुम्हीही, (नारंभट, देवीसिंह उठतात. आणि पुढील पडदा पडतो.)

देवीसिंह : अरे भटुरड्या, तू याच्या कुळातला गुरू झालास. तेव्हा आता गुरासारखे झोडपून काढायला काही हरकत नाही. पाडू का आता दांत? काय म्हणालास मघा माझ्या बायकोला! (अंगावर जातो.)

नारंभट : अरे, अरे, इष्ट कार्य साधले म्हणून तू मला धन्यवाद द्यावेस; ते हे काय? तुझ्या त्या जुन्या बायकोला काय म्हणालो ते, ही नवीन बायको तुला मिळवून दिली; या आनंदात विसरे आता. मित्रा, आणि तू मला, एकदा दोनदा वाकडे प्रश्न करून तोंडघशी पाडीत होतास तो का?

देवीसिंह : तो माझा मूर्खपणा होता.

नारंभट : आणि म्हणूनच, मूर्खपणाची टकळी बंद पाडण्यासाठी, त्याला असा थोडासा पेचात दाबून धरणे, हा माझा शहाणपणा होता. जाऊ दे ते. जे अंती गोड, ते अवघे गोड. एका महिन्यात या मालिनीला तुझ्या गळ्यातली माळ करून देतो, मग तर झालना? हे पहा पण कमलिनीची जी ठेव आपण गंगाजीच्या मंदिरात परवा देऊन ठेविली, ती त्या इब्राहिमच्या दृष्टीससुद्धा पडली न पाहिजे अं. हिंदु पोरींवर, हिंदूचाच हक्क आहे.

देवीसिंह : अरे; गंगाजी म्हणजे, तुझा माझा गुरू आहे गुरू! आजपर्यंतच्या ठेवी तिने कशा सांभाळून ठेवल्या आहेत! ठेव तर सुरक्षित ठेवतेच, पण दहा पंधरा दिवसाआड आपण जाताच, ठेवीवरच्या व्याजाचे रुपये पण, चुंबनी चलनात कसे मोजून देते, छण छण!

नारंभट : हे काम जमल. आता त्या देवळासमोर दुकान मांडून बसणाऱ्या चोख्यास आरडाओरड करून पिटाळून लावायचा नाही का? पूजेस येता जाता त्या धेडाची सावली पडते अंगावर.

देवीसिंह : लुच्चा शिंचा! हुसकायला पाहिजे त्याला तिथून! देवळात येत्या जात्या मुलींवर डोळा असतो त्याचा. सगळा भ्रष्टाचार मांडला आहे त्याने. पण आता आमच्या चिथावणीने आणि त्याच्या शिवाशिवीला कंटाळून, सर्व हिंदुलोकच उलटले आहेत त्याच्यावर. अस्पृश्य म्हटला की मला कशी किळस येते!

नारंभट : आणि खरे सांगू का, माझ्यापेक्षा अधिक सद्गुणी असा मनुष्य पाहिला म्हणजे मलाही पण त्याची अशीच किळस येते. मीही काय कमी सज्जन आहे कारे? हाः हाः (हसतो.) आज त्या चोख्याला देवळाच्या समोरून उखळू या चला. (जातात.)

प्रवेश ६ वा

(चोखामेळा देवळाचे मार्गावर बसला आहे.)

चोखा : प्रभुजी! पांडुरंगा! आमचा आजचाही जीवनदिन संपत आला. तरीही, भगवंता, अजून तुझे चरण नाहीतच - पण तुझ्या देवळाचे द्वारही आम्हास दिसू शकत नाही. कालाच्या उषःकालापासून तो आता या क्षणापर्यंत, युगांच्या घटकांच्या घंटा एकसारख्या मोजीत भगवान् तुमच्या देवळाची वाट मी एकसारखा चालते आलेला आहे. पण ही अवघड चढणीची वाट, अजूनही संपत नाही. एक एक योनीची एक एक पायरी चढत, चौऱ्यांशी लक्ष पायऱ्या चढलो, परंतु अजून देवळाच्या तटासही स्पर्श करिता आला नाही! या तुझ्या देवळाच्या वाटेला शेवट आहे का? हिच्या टोकास देऊळे तरी आहे का? नुसती वाटच वाट? जो जो प्रवासी, ती वाट देवळाकडे जाते या आशेने ती चालते गेला; तो तो वाटेतच थकून देह ठेविता झाल्याने, पुढे कुठे तरी देऊळे आहे की नाही; हे सांगावयास कोणी परत येऊ शकला नाही- आणि म्हणून ही देवळाची वाट कोणत्याही देवळास जात नाही, ही गोष्ट अजून लोकांना समजलीच नाही; असे तर नसेलना? कसही असो, ही अवघड चढण चढता चढता आमचे पाय तर थकले. आपल्या स्वतःच्या कर्माच्या गतील तुझ्या देवळास येईन, ही निश्चिति डळमळली. आता या वाटेवरच हा असा- सर्व आशा आणि निराशा तुझ्या पायांवर, जे पाय देवळाचे तटाचे आड असल्याने मला अजून दिसत नाहीत, त्या पायांवर, पतितपावना अर्पून, मी हा तुमच्या गांवचा थकला भागलेला महार, या वाटेवरच - या धुळीतच बसणार. तुझ्याकडे येणाऱ्या माझ्या कर्माची गति खुंटली. आता माझ्या दुर्बलतेची दया येऊन, हे दयामया, माझ्याकडे येणाऱ्या तुझ्या कारुण्याची गति, तुला मजकडे आणील तर आणील.

(अभंग)

भवाचिया भेणे येतो काकुळती । धावे करुणामूर्ती देवराया ।।
पडलोसे मायामोहाचिया जाळी । येवोनि सांभाळी देवराया ।।
गहिवर नावरे चोखियाचे मनी । धावे चक्रपाणी देवराया ।।

देवा! निदान त्या तुझ्या संतांनी वर्णन केलेल्या मनोहर मूर्तीच तरी दर्शन या माझ्या डोळ्यांना घडू द्याल का? हे हजारो जन या देवळात जात येताहेत; तुला पूजेची फुले वाहतात; तुझा प्रसाद घेतात आणि परत येताना तुझे ते सांवळे सुकुमार रूप, डोळे भरून पाहतात; पण मला देवाच दर्शन कोण घेऊ देणार? मी महार! मी पतित! तुझ्या देवळाच्या भोवती, या तुझ्या पूजकांनी उभारलेला, हा अस्पृश्यतेचा दुर्लंघ्य तट वलांडून, मला पतिताला तुझे दर्शन कसले घेता येणार? पण देवा, तुझ्या भक्तासाठी, तुझ्या पूजकांच्या ह्या स्पृश्यतेच्या तटाबाहेर येण्यास तुला देखील अशक्यच आहे का? अहो, कोणी मला विठ्ठलाच दर्शन घेऊ द्याल का? विठ्ठलाच दर्शन विठ्ठल घेऊ देतो तेव्हाच होते. पण निदान त्याच्या मूर्तीच तरी दर्शन घेऊ द्याल का?

(अभंग)

श्रीमुख चांगले कांसे पीतांबर । वैजयंती हार रुळे कंठी ।।
तो माझ्या जीवीचा जिवलग सावळा । भेटवाहो डोळा संतजना ।।
चोखा तयापाशी घाली लोटांगण । वंदिले चरण प्रेमभावे ।।

www.savarkarsmarak.com

पन्नालाल : (प्रवेश करून) अरे, हा देवळाच्या वाटेवर कोणी भिकारडा बसला आहे कटकट करीत! भिकूशेट, कोण हा?
भिकूशेट : अहो हा माहीत नाही का? हा तो चोखा महार. हा अमंगल महार आपल्या भिकारड्या भक्तीचे प्रदर्शन करीत, या वाटेवर नको नको म्हणत असता असा नित्य बसलेला असतो. पन्नाललशेट, याला हुसकला पाहिजे येथून.
पन्नालाल : खऱ्याच भक्तिभावान बसतो की काय?
भिकूशेट : अहो कसली भक्ति? घरी खायला नाही. उद्योग करायला नको. रांडा पोर तर हवीत- म्हणून येथे हे भक्तीचे दुकान घालून बसतात, हे ढोंगी लोक! इतरांचा इतका त्रास तरी नसतो. पण हा महारडा, देवळात येणाऱ्या जाणाऱ्या पूजकांना आणि दर्शकांना, प्रसादच द्या विठोबाचा- काही निरोपच सांगा म्हणून वेड्यासारखा विचारीत इतका पुढे येतो की, सावली पडून विटाळ झालेल्या लोकांचा, देवळांत भ्रष्टाकारच माजतो. भजने इतकी मोठ्याने म्हणतो की, प्रदक्षिणेच्या वाटेवर कुणी मंत्र तंत्र म्हणत जायची चोरी झाली आहे. त्यांच्या स्तोत्रमंत्राच्या उच्चाराला याचा हा महारडा आवाज शिवताच ते पवित्र मंत्र विटाळले जातात. हा पहा आलाच प्रसाद मागायला, पाहिलात?
चोखा : महाराज, पांडुरंगाच्या नैवेद्यातील काही प्रसाद मला मिळेल का?
पन्नालाल : मग तू स्वतःच ताट वाढून नैवेद्य का नाही दाखवीत देवाला? दुसऱ्याने दाखविलेल्या नैवेद्यातील प्रसाद का मागतोस! ही तुझी भीक मागण्याची एक लबाड युक्तीच दिसते.
चोखा : महाराज नैवेद्य नेऊ द्याल का, माझ्या नारायणापुढे? अहाहा, बोला. मी माझ्या जीवनाचे सार्थक झाले असे समजेन की, जर एक दिवस तरी, हे माझे पापपुण्याचे वाढलेले ताट नेऊन, त्या भगवंताचे पायावर प्रत्यक्षपणे समर्पण करिता येईल आणि ती मूर्ति डोळे भरून पाहता येईल.
भिकूशेट : अरे, तुला महार आम्ही केले का देवाने? त्याला विचार तुझा नैवेद्य आत नेण्याची परवानगी. कसला नैवेद्य दाखविणार? मृत मांसाचा ना?
चोखा : शिव, शिव, शेटजी, हा चोखा उभ्या जन्मात मृत मांसास काय, पण मांसासही शिवला नाही.
भिकूशेट : तू शिवला नसशील तर तुझा बाप शिवला असेल.
चोखा : असेलही, महाराज. जाणून बुजून आम्ही महार. तुम्ही ज्या रीतिभाती जातीच्या घालून दिल्यात, त्याप्रमाणे वागतो. आणि म्हणूनच, जीव विठ्ठलाचे दर्शनासाठी कासावीस असताही, हे त्याच्या देवळाच्या कळसाचे तेवढे दर्शन घेऊन मी समाधान मानतो; आणि दुपारी त्याच्या प्रसादाची चार उष्टी शिते कोणी फेकली तर, ती वंदून आणि सेवून, मग अन्न ग्रहण करितो. हीच माझी पूजा.
(अभंग)
याती हीन देवा, न कळे अन्य काही सेवा ।।
आम्हा नीचांचे ते काम, वाचे गावे सदा नाम ।।
उच्छिष्टाची आस, तुमच्या दासांचा मी दास ।।

नारंभट : (प्रवेश करून) ह, ह आता तू आमच्या दासाचा दास झालास का? अहो हाच चोखा, त्या दिवशी महारांना ब्राह्मणासारखे स्नान करून शुचिर्भूत व्हा, म्हणून शिकवीत होता. आणि कारंज्याचे पाणी बळाने बाटवून, ब्राह्मणांना शिव्या देण्यास सांगत होता.

पन्नालाल : खरच की काय, तोच का हा हा? नमस्कार. अरे धेडा!

भिकूशेट : तुला ब्राह्मण व्हायला पाहिजे का? करू तुला आम्ही?

चोखा : अशी अमर्यादा मी कशी करीन, महाराज, तुम्हा सर्वांची? नमस्कार नव्हे, तर.

(अभंग)

जोहार मायबाप जोहार । तुमच्या महाराचाही महार ।।

बहु भुकेला जाहलो तुमच्या उष्ट्यासाठी आलो ।।

प्रसादाची आस । तुमच्या दासाचा मी दास ।।

चोखा आणी पाटी । प्रसादाचे उष्ट्यासाठी ।।

नारंभट : परंतु हे उष्टे, ती फटाकडी पोर खाईल का तुझी? अहो त्या दिवशी, एका फक्कड कुमारीच्या गळ्यात हात गुंफून, ही स्वारी गोपींची गाणी तिच्याकडून म्हणवून घेत होती.

देवीसिंह : पक्का बगळा भगत आहे तो. मी तुम्हाला सांगतो की या प्रदक्षिणेच्या वाटेवर हा पाजी जो बसतो, तो एवढ्याचकरिता की, याच्या बापजन्मी ज्या आम्हा क्षत्रिय वैश्यांच्या सुंदर बायकांचे, नख देखील ज्यास दिसायचे नाही, त्यांची तोंड ह्याला एकसारखी निरखिता यावीत. देवळाच्या वाटेवर बायका आल्या की, हा लागला पहायला टकमक, टकमक त्यांचेकडे. ऐकलंत भिकूशेट.

भिकूशेट : अरे चांडाळा, तरीच बरे का! अहो साहजिकच आहे. महारवाड्यांतील कुरूप कुग्रासास कंटाळलेले हे, या पतितांचे डोळे, आम्हा ब्राह्मण, वैश्यांच्या स्त्रियांचे स्निग्ध सौंदर्य पाहताच, असे हपापलेले होतात की दुष्काळात पाला खाऊन दिवस कंठणारी कंगाल भूक, एखादा द्राक्षांचा लुसलुशीत घड पाहून जशी हपापते. हुसका याला येथून.

नारंभट : अहो हुसकलाच पाहिजे याला. तुम्हा आम्हाला एकमेकांच्या बायका इतक्या डोळे भरून पाहता येत नाहीत की, जितक्या या धेडाला - इथे बसल्या बसल्या पाहता येतात. चल चोख्या. का लगावू थप्पड.

देवीसिंह : विटाळ झाला तरी चालेल, लगाव, हकालो सालेकू. हा इथे बसून ही वाटच विटाळतो, स्नान केलेच पाहिजे एवी तेवी.

चोखा : पण मी आपले काय वाईट केले आहे? मी पाया पडतो.

भिकूशेट, पन्ना : दूर दूर, सावली पाडली अखेर चांडाळाने. अहो हुसका या महारड्याला येथून.

(मुलीवर डोळा ठेवतो, शिवतो, भ्रष्टाकार करितो, ब्राह्मण होऊ पाहतो, अशी ओरड करीत नारंभट, देवीसिंह असे सर्व त्यास धक्के मारीत हुसकून देतात.)

प्रवेश ७ वा

(चोखा हुसकून दिल्यानंतर दुसऱ्या वाटेवर उभा आहे.)

चोखा : हाय, हाय, कोण ही माझी दुर्गति! माझीच काय, पण आम्हा अस्पृश्यांची कोण ही केविलवाणी स्थिति! देवाच दर्शन तर नाहीच, पण देवळाच्या कळसाचे तरी दर्शन मला त्या देवळाच्या वाटेवर घडत होते. स्पृश्यतेच्या तटाचे आत नाही, पण तटाला लागून मी बसत होतो, त्यामुळे भगवंताची आरती देवळात चाले तेव्हा, ते मधुर घंटा-तासांचे ध्वनि तरी माझे कानावर पडून, माझा प्रियकर त्या वेळी काय करीत असेल, याची मला कल्पना करिता येई, पण आता तेही सुख मला पारखे झाले. आता त्या वाटेवर मला कोण बसू देणार? प्रसादाची चार उष्टी शिते खाल्ल्यावाचून अन्नग्रहण करणे नाही, हा माझा नियम. पण आता ती चार शिते देखील मला आज मिळाली नाहीत. आता मी देवाची सेवा कशी करू?

(अभंग)

हीन याती माझी देवा । कैसी घडे तुझी सेवा ।।

दूर दूर हो मज म्हणती । भेटू तुजला कवण्या रीती ।।

माझ्या गोविंदा गोपाळा । करुणा भाकी चोखा मेळा ।।

का मी खरोखरच इतका नीच मनुष्य आहे की, मला हे सर्वजण म्हणतात तसा, देवभक्तीचाही अधिकार नाही? मी महार आहे म्हणून माझा हे धिक्कार करतात; की मी नीच मनुष्य आहे म्हणून? पण मी मनुष्य तरी आहे का? का कोणी धुळीत रांगणारा किडा आहे? इतका निकृष्ट किडा की, त्याला तुडवण्यासाठी देखील कोणी, पायानेही शिवू नये? मघा मला ज्यांनी हुसकून दिले; त्यांच्या पाया पडायला गेलो तर तो देखील त्यांनी विटाळ मानला पण त्यांना दोष का द्यावा! त्यांच्या म्हणण्याप्रमाणे खरोखरच शास्त्रांची आज्ञा असेल तर माझीच चूक आहे. मला देवाच्या दर्शनाचा अधिकार, खरोखरच का नाही! मला देवाच्या सेवेचा, देवाच्या वाटेवर बसण्याचा, देवाच्या प्रसादाचे उष्टे खाण्याचा, मोठ्याल देवाच्या द्वारी भजन करण्याचा अधिकार खरोखरच का नाही? मला देव तरी आहे का? हाय! हाय! मग आम्हा अस्पृश्यांच्या जन्माचे इतिकर्तव्य तरी काय?

(अभंग)

किती धावाधावी करावी कोरडी, न कळे काही जोडी हानी लाभ ।।

मी जे जे करी ते ते फुलकट, वाउगेचि कष्ट दुःख भोगी ।।

चोखा म्हणे देवा ऐसा मी करंटा, कशी तुझी आता सेवा करू ।।

हे कोण? हे शाब्दशास्त्री येताहेत. हा ब्राह्मण परोपकारी आणि शास्त्राधाराचा आधारस्तंभ म्हणून, उभ्या पंढरीस माहीत आहे, ह्यांसच आता आपला प्रश्न टाकू. पण त्याचे हातांत प्रसादाचे ताट असून, तोंडाने तो काहीस पुटपुटत आहे. तेव्हा हाक तरी कशी मारू? नाही तर अस्पृश्य आवाजाल त्याच्या पवित्र

मंत्रोच्चाराला विटाळ होईल! खुणावून पाहू आले तर! (ते किंचित् जवळ येताच जोहार करून हात चोळीत पुटपुटत बोलतो.) महाराज, एक शंका विचारायची आहे.

शाब्दशास्त्री : चोखा, तुला मी कितीदा खुणावले की, तू वाटेतून बाजूस होऊन माझ्या दृष्टीस पडू नकोस म्हणून. आपल्या इकडे म्लेंच्छ राज्यात अनाचार वाढला आहे. परंतु हिंदु धर्माचे शुद्ध स्वरूप जिथे अजून नांदत आहे, त्या प्रांती वैदिकादिक ब्राह्मण महारादिकांच्या दर्शनाचाही विटाळ मानितात. महारादिक नुसते अस्पृश्यच नव्हते तर अदृश्यही आहेत. त्यातही हा भगवंताचा नैवेद्य घरी नेणे. आता तुझ्या दृष्टीने अपवित्र झालेला नैवेद्य मला केवळ फेकून दिला पाहिजे. असा गहिवरून येऊं नकोस. चोखा, तू सुशील आहेस, देवलसी आहेस, पण तू महार आहेस. मला तुझी दया येते, पण शास्त्रवचन दुर्लंघ्य आहे. उद्यापासून तरी असा वाटेला उभा राहू नकोस. विचार आता आज काय ते. एवीतेवी विटाळ झालाच आहे.

चोखा : महाराज, आता मी जे विचारणार आहे, त्याचे उत्तर मिळताच हा चोखा उद्यापासून या वाटेवरच काय पण क्वचित् या जीवनाचे वाटेवरही पुनः उभा राहणार नाही, कोणास दिसणार नाही, मला आत्ताच देवळाचे वाटेवरून धक्के मारून मारून हुसकून देण्यात आले. देवा, मी शपथेवर सांगतो की त्या निंदेने मी उद्विग्न झालो नाही. निंदा ही अहंकाराची साचलेली जाळी झाडून टाकून माझे हृदयगृह प्रत्यही साफसूफ करून ठेवण्यास अत्यंत उपयोगी पडते; परंतु आज माझ्यापुढे एक गाढ अंधेराचा ढग येऊन जी अरुंदशी एक पाउलवाट माझ्या महाराच्या जीवनातही मला परममंगलाकडे, चिरंतन सुखाकडे जायला दिसत होती. तीहि एकाएकी दिसेनाशी झाल्याने मी असा कासावीस झालो आहे. महाराज, मला थोडक्यात सांगा. भगवंताच्या मंदिराकडे ज्ञान, दान, तप, योग इत्यादि जे राजमार्ग जातात; त्यांवर अस्पृश्यांनी बसू नये हे मला माहीत आहे. परंतु नामाची जी एक अरुंद पाउलवाट त्याच पावन मंदिराकडे जाते तीवर अस्पृश्यांस बसावेयास अधिकार शास्त्रांनी दिलेला नाही का? देव देखील आमच्या स्पर्शाने बाटतो म्हणून हे पुजारी म्हणतात हे खरे का? प्रसादाचे पावन ताट आमच्या दृष्टिपातासरशी अपवित्र होते; आम्हाला प्रसादाची उष्टी चार शिते खाण्याचाही अधिकार नाही हे खरे का? महाराज, महारांस ह्या जन्मात उद्धार नाही हे खरे का?

शाब्दशास्त्री : चोखा, शास्त्र विचारतोस म्हणून मी तुला सांगतो की हे खरे आहे. अस्पृश्यांस नामाचाही अधिकार नाही. अस्पृश्य, अस्पृश्यच नसून अदृश्यही आहेत. या जन्मी त्यांना उद्धार नाही.

चोखा : पण शाब्दशास्त्री महाराज,

अजामिळे पापराशी । तोहि नेला वैकुंठासी ।।

रोहिदास चांभार । आणिक वैष्णव अपार ।।

शाब्दशास्त्री : तू म्हणालास ना की तर्कवाद करणार नाही, नुसत शास्त्र काय ते विचारतोस म्हणून? शास्त्र, मला कळत तसे मी सांगितले. चोखा, मला तुझ्या सद्‌गुणांकडे पाहून फार दया येते. पण बाबा, शास्त्र निष्ठुर आहे. तथापि हेच तुझे सद्‌गुण तुला पुढील जन्मी कोण्या योगभ्रष्टाच्या कुळांत जन्म द्‌यायला कारण होतील, आणि मग भगवंताच्या देवळाची या जन्मात तुला न उघडलेली दार उघडू शकतील. जातो मी आता.

चोखा : एक क्षणभर थांबा- महाराज- या शास्त्रांचा आपण दिलेला निर्णय सर्वसामान्य आहे काय? व्याधाने गीता उपदेशिली, ज्ञानरायाने रेडा बोलविला.

शाब्दशास्त्री : चोखा, पुनः तर्क? हे पहा, शास्त्रांचा मी दिलेला निर्णय सर्वमान्य आहे. तथापि ह्यांना अपवाद आहेत, हेही खरे आहे.

चोखा : शेवटचा प्रश्न-हे अपवाद कोणचे आणि शास्त्रांशास्त्रांतही भिन्नता दिसतात तिचा निर्णय करणारा समर्थ अधिकारी कोण? शास्त्रांवरही कोणी अधिकार गाजवू शकतो का?

शाब्दशास्त्री : होय! पण तो अधिकार कोणी मनुष्य गाजवू शकत नाही. केवळ सर्व शास्त्रांचा कर्ता आणि धर्ता जो परमेश्वर, तोच काय तो शास्त्रांवरही अधिकार गाजवू शकतो. त्याचा जो निर्णय तो शास्त्रांनाही स्वमस्तकावर सादर धारण करावा लागतो.

चोखा : होय ना महाराज? मग यावे आता, आपणच माझे सद्‌गुरु, आपण मला खरा मार्ग दाखवलात. आता मी माझ्या बुद्धीने वा लोकबुद्धीने, काहीच सत्य किंवा असत्य, वैध किंवा अवैध, असे ठरविणार नाही. आता सर्व शास्त्रांचा कर्ता आणि धर्ता जो परमेश्वर, त्याला मी प्रत्यक्ष हा प्रश्न विचारणार! माझ्या एकट्‌यासह नव्हे; तर कोटि कोटि अस्पृश्य जातीच्या जीवनाचे अंतिम ध्येय कोणते, आम्हासही देव आहे किंवा नाही! याच जन्मी, हेच देही, हेच डोळा, भगवंताच दर्शन आम्हास घडू शकत का नाही; ह्याचा निर्णय प्रत्यक्ष पांडुरंगाचे मुखान हा पतित लावून घेणार.

शाब्दशास्त्री : वेड्‌या, अशा वल्गना करू नकोस!

चोखा : वल्गना! नाही महाराज, व्रत. मी प्रसादाची चार शिते मिळाल्यावाचून अन्नग्रहण करीत नाही. आजपासून प्रसाद मिळणार नाही मला. मी पण अन्न घेणार नाही. जेव्हा पांडुरंग येऊन प्रत्यक्ष प्रसाद देईल तेव्हाच खाईन नाही तर -

शाब्दशास्त्री : ह्या हट्टापायी व्यर्थ आत्महत्या करावी लागेल!

चोखा : लागो! कोटि कोटि अस्पृश्यांना ह्याच जन्मी उद्धार आहे की नाही, ह्या महान् प्रश्नाच अंतिम उत्तर मिळण्याच्या, कोटि कोटि अस्पृश्यांना मनुष्यत्वाचे अधिकार मिळवून देण्याच्या, महत्तम कर्तव्यी एकाची हत्या घडली तर ती हत्या नसून तो हविच होईल!

शाब्दशास्त्री : पहा बुवा मी जातो आता, मला स्नान केले पाहिजे. बरे हा प्रसाद विटाळलाच आहे तर आज हा तू घे आणि अन्नग्रहण कर.

चोखा : आभार आहेत महाराज आपले! पण आता मनुष्याच्या हातून देवाचा प्रसाद घेणे नाही. कारण क्वचित् ते खरोखरच शास्त्राच्या विरुद्ध असेल; तर मी पापाचा वाटेकरी होईन. मनुष्याचे हातून आता प्रसाद घेणे नाही. मनुष्याच्या तोंडून आता शास्त्र ऐकण नाही. आता घेणेच, तर प्रसाद प्रत्यक्ष त्या पतितपावनाचे हातूनच घेणे, यावे आपण, जोहार.

शाब्दशास्त्री : (जाता जाता) काय असेल ते असो, पण सच्छील, सभ्य, व्यवस्थित आणि साधुवृत्ति चोख्यास पाहून, मला पटकन् त्याला नमस्कार करावासा वाटतो. काय करावे, तो महार. शास्त्र, रूढि व्यक्तीला अनुल्लंघ्य आहेत. (जातो.)

चोखा : ठीक. सगळी मनुष्ये गेली. आता माझा विठ्ठल आणि मी. आता देव आणि भक्त, आता उधारीची गोष्ट संपली. आता अस्पृश्यास या जन्मी काय कर्तव्य आहे, आणि जरी या जन्मी उद्धार नसला तरी, अन्य जन्मी तरी उद्धार व्हावा म्हणून या पतित योनीत काय नियम पाळले पाहिजेत आणि कशी भक्ति केली पाहिजे, याचा उलगडा प्रत्यक्ष पांडुरंगाचे तोंडी करवून घेणार आता -

पद - १२ वे

निर्धार हाचि झाला, पाहिन मी, ऐंद्रिया पटला प्रति तटतट

तोडुनि मूर्त माधवाला ।। ध्रु. ।। न तरि पडो हा प्राण गळोनी,

मांस झडो तनु जावो सडुनि! न मी व्रता ढळू देणार ।। १

अंक तिसरा

प्रवेश १ ला

सत्यवान् : (सत्यवान् सत्यागारात बसला आहे. शिष्य शिष्यिणी उपदेश ऐकत आहेत.) म्हणून म्हणतो सत्य हाच वेद. 'नहि सत्यात्परोधर्म : नानृतात्पातके परं' हेच वेदाचे पहिले आणि शेवटचे वाक्य. बाकी सर्व कहाण्या आणि गप्पा भरलेल्या आहेत.

पहिला शिष्य : बरे, आपल्या सत्यवेदाप्रमाणे सत्याची व्यवस्था काय? त्याला काही अपवाद आहेत काय?

सत्यवान् : शिव शिव, काय प्रश्न हा? सत्याला अपवाद म्हणजे, असत्य. तेव्हा केव्हा केव्हा अपवाद नसतात काय - म्हणजे, केव्हा असत्य अंगीकारावे काय - असाच त्याचा अर्थ होतो. त्याला उत्तर एकच की, जे मनात तेच वाचेत, तेच कृतीत. हाच निरपवाद वर्तनक्रम, म्हणजेच सत्य धर्म. कोणी कोणी सत्यधर्माचे उल्लंघन न करता चूप बसणे, हे सत्यधर्मास विरुद्ध समजत नाहीत. पण आपणांस एखाद्याने प्रश्न विचारिला म्हणजे आपण असत्य न बोलता जर चूप बसलो तर, त्याचा अर्थ असाच होते नाही का की सत्य गोष्ट त्याला कळू नये, अशी आपण इच्छा करितो. त्याची असत्य समजूत रहावी. अंशतः तरी असत्य तेच सत्य असावे असे त्यास भासू द्यावे, असा त्या चूप बसण्यांत आपला हेतु असतो, म्हणजे आपण न बोलता असत्य बोलतो. अशा प्रकारचा लोप, ही निव्वळ फसवणूक नव्हे का? म्हणूनच खऱ्या आणि सत्य वेदांत चूप बसण्यास स्थान नाही. 'सत्यं वद' ही वेदाज्ञा आहे. सत्याचा अपलाप कर. मौनाने असत्याचा फैलावे कर, अशी नाही. एतदर्थ, शिष्यहो, या सत्यसागरात सत्य तेच बोला, इतकेच नव्हे; तर सत्य ते बोलाच, प्रश्न होताच किंवा न होताही सदोदित सत्य तेच सांगत चला.

दुसरा शिष्य : आचार्य, रघुवंशामध्ये सत्याविषयी-

सत्यवान् : काय करावे! मला पदोपदी तुम्हास हटकावे लागते - रघुवंश हे काव्य आहे हे तुम्हास माहीत आहे आणि काव्य म्हणजे कल्पना, कल्पना म्हणजे असत्य. एतदर्थ या आश्रमांत काव्याचा उच्चारही निषिद्ध केलेला आहे. थोडा सूक्ष्म विचार करा. कवितेची मुख्य शोभा अलंकारशास्त्र. अलंकारशास्त्राचा आत्मा म्हणजे उपमा, पण उपमा म्हणजे असत्य. रघुवंशाचीच गोष्ट घ्या ना का? आरंभानंतरच कालिदास म्हणतात, मी दुस्तर समुद्रास लहानशा पडावात बसून उल्लंघू इच्छीत आहे. केवढे हे धडधडीत खोटे विधान. त्या वेळी कालिदासापाशी क्वचित् शाई, कागद, लेखणी इत्यादि लेखनसाहित्य असेल आणि रघुवंश लिहिण्याचा त्याचा हेतु होता. परंतु समोर समुद्र नव्हता, दुस्तर समुद्र तर नव्हताच, पडाव नव्हता किंवा त्यात बसून तो समुद्र तरून जाण्याची इच्छा नव्हती, तरी हे खोटे विधान केवळ अलंकार म्हणून

दिले दडपून की पडावांत बसून समुद्र तरू इच्छीत आहे. सुंदरीचे मुख म्हणे चंद्र आहे. चंद्राला भात घालीत नाही म्हणून, जर मुखात कोणी भात घातला नाही तर त्याचे आणि त्यायोगे ती वर्णनविषयक सुंदरी मेली तर ते पाप ह्या मम्मटासारख्या अलंकारशास्त्र्यांवर आणि ह्या कालिदासासारख्या थापेबाजांवर आहे. मुख काय धडावेगळे ढगामध्ये हिंडत असते, का चंद्राला दांत आहेत? सुंदरीचे तोंड जर खरोखरच, चंद्रासारखे सुकून गेलेल्या समुद्राच्या प्रचंड खड्ड्यांनी युक्त असेल आणि इतके मोठे असेल की, मनुष्यास त्यावर चढून ते समग्र बघण्यास वर्षे लागावी; तर, त्या सुंदरीला पाहताच, लोक भीतीने पळू लागतील पळू! हा म्हणे अलंकार! अहो पद्धतशीर खोटे कसे बोलावे आणि ते किती प्रकाराने बोलता यावे; हे शिकवणारे शास्त्र म्हणजेच अलंकारशास्त्र होय. त्याच्या आश्रयाने लिहिलेली ही पंचमहाकाव्ये म्हणजे पंचमहापातके होते. ती आम्ही मुलांस लहानपणीच शिकविणार. मग काय आश्चर्य आहे की खोटे बोलणे मनुष्याचा स्वभावच होऊन गेला आहे. एतदर्थ ह्या माझ्या आश्रमांत अलंकारशास्त्र, काव्य, कविता, नाटक, कादंबरी पशुपक्ष्यांच्या गोष्टी, या विषयांवरील सर्व ग्रंथ एकत्र करून, मी स्थापनेच्या दिवशीच त्यांची मोठी होळी केली; आणि ह्या असत्याच्या राखेच्या ढिगावर हे सत्याचे मंदिर उभारले.

तिसरा शिष्य : तर मग पंचतंत्र, हितोपदेश हे त्याज्यच होते.

सत्यवान् : सर्वस्वी. अहो ते नीतिग्रंथ कसले? ते अनीतिग्रंथ आहेत. काय म्हणे घोडा म्हणाला, उंट हसला, उंदिर उत्तरला! धिक्कार, धिक्कार, त्या असत्यवाद्यांना. त्यांचे नाव काढले की अंगाची लाही होते.

दुसरा शिष्य : ही लाहीची पण उपमाच झाली.

सत्यवान् : क्षमा करा बरोबर धरलेत! अंगाचा संताप होतो. माझ्या आश्रमात एक वेळ मद्य प्याल तर चालते, कारण ते सत्य आहे. पण काव्य वाचणे खपत नाही. काय बाई तुम्ही का आलात?

बाई : माझ्या मुलाचे डोक अतिशय दुखते आहे.

सत्यवान् : बाई, चार दिवस तुम्ही निर्भेळे सत्य बोला, तुमच्या मुलाचे डोक हटकून राहील. काय? अविश्वास वाटतो? अहो तुम्ही सत्य बोललात म्हणजे तुमच मन प्रसन्न राहील. मनात प्रसन्नता आली की सात्विकभाव उदयाला आले; की, तुमच्या आसपास सत्व आणि प्रसन्नता फैलावून मुलाचे डोक दुखणे म्हणजेच अप्रसन्नता दूर होईल. सत्याने सर्व रोग दूर होतात.

तिसरा शिष्य : मला एक गोष्ट विचारायची आहे. पण ती एकान्तात आपल्याला विचाराविशी वाटते.

सत्यवान् : सत्यागारात, आणि एकांतात? तुम्हाला सत्यधर्म म्हणजे काय हे मुळीच कळले नाही. एकान्त म्हणजे इतरांपासून काही लपवून ठेवण्याची इच्छा लपविणे म्हणजे असत्य. म्हणून सत्यधर्माचे अनुयायास एकान्तात काहीही गोष्ट बोलण्याची वा करण्याची सक्त बंदी असते. आम्ही आमच्या शिष्यशिष्यिणींस नियम घालून दिलेला आहे की, जर तुम्हास सत्यवक्ती संतति हवी असेल तर प्रजनन हे देखील एखाद्या पापकृत्यासारखे अंधःकाराचे पडदे सोडून करू नका; तर स्वच्छ, स्पष्ट, आणि सत्यप्रकाशाच्या सूर्यकिरणांत तुमचे गार्हस्थ्य धर्म आचरीत जा; म्हणजे संतति गर्भापासून सत्यवक्ती आणि निरोगी होईल. सध्या गर्भाधानाचे सुमंगल समयीच असत्याचे संस्कार त्या बीजावर केले जात आहेत. कारण ते धर्मकृत्य एकान्तात लज्जेच्या आड लपून संपादन करण्याची घातके प्रवृत्ती आमच्यात पडली आहे. हेच पशु पहा. लज्जा म्हणजेच असत्य-लपविणे म्हणजेच असत्य- एकान्त म्हणजेच असत्य - या तिन्ही असत्यांची पशूंच्या प्रजननप्रसंगी मुळीच छाया पडत नसते म्हणून पशु कधीहि असत्य बोलत नाहीत. जर एकान्त, गर्भाधानासारख्या अत्यंत सुमंगल आणि गंभीर धर्मकृत्यासही असत्याचे स्पर्शाने, पापी ठरवितो तर इतर प्रसंगी एकान्तात बोलणे, हे किती असत्यप्रद असेल हे काय सांगायला हवे!

पहिला शिष्य : बरे, उघड सांगतो, काल सकाळी सूर्य उगवताच-

सत्यवान् : खोटे. सूर्य उगवत नसतो. पृथ्वी फिरता फिरता सूर्य दिसू लागतो, (मागे पडद्यात मुलांचा गोंधळ होतो.) कायरे कृष्णा, अंधळ्या मुलांनो, काय गोंगाट आहे रे? (मुले भीत भीत येऊन)

कृष्णा : काही नाही, आम्ही खेळत होतो.

सत्यवान् : आता काय करावे? अरे खेळत होतो म्हणतोस आणि तरी काही नाही, असे कसे म्हणतोस? काही नाही, असे म्हणण्याची खोड मोठमोठ्या साधुसंतांनाही लागली आहे! अरे हा तू, हा मी, हे लोक ह्या वस्तु सर्व डोळ्यांसमोर असताना, काही नाही काय म्हणालास? ह्या आश्रमातील विद्यार्थीच जर असे खोटे बोलतील तर मग इतरांना काय दोष? काय काम आहे? काही नाही, थोडे रुपये पाहिजे होते! काय आणले आहे रे? काही नाही, एक घोडा आणिला आहे! अरे हे कोण असत्य. एवढा मोठा घोडा आणलास, नि काही नाही काय म्हणतोय? परवा त्या चोखामेळ्याला रस्त्याने घरी परत जाताना पाहिले. मागे लोक त्याला धक्के मारीत होते आणि देवळाचे वाटेवर येशील तर, हाड मोडून टाकू म्हणून धाक दाखवीत होते. मी सहज विचारले, चोखा! काय झाले? तेव्हा तो म्हणाला, काही नाही, लोक जरा रागावले आहेत माझ्यावर! ही परा शांति का असत्याची पराकाष्ठा! एवढा मार खात होता आणि म्हणाला काही नाही!

पहिला शिष्य : पण आचार्यांना त्याची दया आली असेल?

सत्यवान् : मुळीच नाही, तो पक्का थापेबाज आणि असत्यवादी आहे. त्या दिवशी भजन करता करता देवाला म्हणाला, तू माझा प्रियकर आहेस आणि मी तुझी राधा आहे! वाः! असली मिशाळ राकट राधा आहे; म्हणूनच तर, तो देव तिला भेटण्याचे स्थानी कोस कोस दूर पळत आहे! या संताना स्वतःला 'बायको' म्हणवून घेण्याला लाज वाटते नाही! कोणी कोणी तर देवालाही स्त्री बनवायला कचरत नाहीत. 'माझी विठाई माउली' म्हणून संताना ओरडताना ऐकून, हया त्यांच्या निलर्ज्ज आणि बायकी खोटे बोलण्याच्या खोडीचा मला इतका संताप येतो; की, त्या सर्वांना या चोख्यासारखंच चोपून काढावस वाटते. अहो, तुमच्या माझ्या भक्तांनी वा पुत्रांनी उद्या तुम्हाला किंवा मला जर साडी चोळी नेसवून बांगड्या भरून बायकांच्या नावाने हाका मारायला आरंभ केला तर किती चीड येईल? तशीच विठ्ठलाला 'विठाई' म्हटले जाताना येत नसेल का?- (मुलांस) बरे काय खेळत होतात तुम्ही?

मुले : लपंडाव.

सत्यवान् : (उठून हताशपणे सुस्कारे टाकीत.) हाय, हाय! हया जगाला मी असत्याचे रोगापासून कसा मुक्त करू? सत्यागारात लपंडाव? लपे म्हणजे लपण. जाणून बूजून आपण असतो तिथे, नाही असे भासविण्याची कला अभ्यासणे आणि त्या लपंचा डाव म्हणजे लपंडाव! मूर्तिमंत असत्याचा अभ्यास! मुलांनो, या आश्रमात लपंडाव, आंधळ्या कोशिबिरी, आट्यापाट्या, इत्यादि लुच्चेगिरीचे असत्यमय खेळ खेळण्याची, यापुढे सक्त बंदी करण्यात येत आहे. मुलींना, भातुकली इत्यादी खेळ निषिद्ध. थंड चुलीत फुंकत, मी सासू स्वयंपाक करते, तू सून हा भात वाढ, असे धडधडीत ढोंग करीत बसणे म्हणजे भातुकली नाही--ही कुलाचा घात करणारी घातुकली होय. मुलींच्या हाती बाहुली देणे, म्हणजे तिला खोटे बोलण्याचा पहिला पाढा शिकवणे होय. लाकडी बाहुली रडते, तिला निजव, म्हणून आई मुलीला सांगते, हाय, हाय! मग ह्याच मुली मोठेपणी, आईलाच नव्हे; तर, नवऱ्यालाही त्याच मुलीच्या नावाने रडते असता पातिव्रत्याच्या थापा मारून, निजविण्यात पटाईत होतात, यात काय आश्चर्य? अशा असत्याने पछाडलेल्या जगात सत्याची प्रस्थापना कशी करू? शिष्यहो, सध्या आम्ही विसावा घेणार, तुमचे अर्धवट राहिलेले प्रश्न उद्या विचारा.

प्रवेश २ रा

जाफरअली : आमच्या येथील सुभेदार बंगषखान यांनी आम्हा मौलवींना जेव्हापासून हिंदूना बाटविण्याच्या कामावर नेमिले; तेव्हापासून हया जाफरअल्लीने सर्वात जास्त काफरांस इस्लामची दीक्षा दिली. याविषयी सर्वापेक्षा जास्त सुंदर परी अल्लाताला मला देईलच; परंतु, या लोकीही आमची काही कमी चैन चालते नाही. एक हिंदु बाटविला की, शंभर रुपये छणछणीत मोजून घेतलेच आम्ही सुभेदार साहेबांकडून! अकबर बादशाहापेक्षाही मी अधिक हिंदु बाटविले. कारण अकबरापेक्षा सूक्ष्म दृष्टीने हिंदु धर्मांचे निरीक्षण करून, मी त्यांच्या चिखलातील कच्चा दुवा बरोबर निवडून काढला. हया ब्राहमणांस बाटवायला जावे तर ते विचारणार, तुमच्या धर्मात नवीन तत्व कोणते आहे! आता तत्वबित्व म्हटले की मला चक्कर येऊ लागते. क्षत्रिय बाटवू म्हणाव तर त्याला पाहिजे जहागीर किंवा बादशहाची मुलगी. आता वैश्य शूद्रांकडे जावे, तर ते म्हणणार मुसलमान होऊन आम्हास विशेष लाभ काय? जे धंदे आम्ही इकडे करितो तेच तिकडे करीत राहणार, मग उगाचे आमच्या कुळाला काळिमा लावून 'बाटगा' म्हणवून का घ्या! अशा रीतीने या चार वर्णांतील हिंदूस शेंडी मुंडायला लावणे इतके कठीण जात की, अकबराची साम्राज्यसत्ता देखील ते काम मनाप्रमाणे करण्याला असमर्थ होते. पण या मौलवी जाफरची युक्ति पहा. या पठ्ठयाने महारवाडा गाठला. वरील चारी वर्णांना बाटवायला एक लाठीचा कोटिक्रम तेवढा परिणामकारक ठरतो. पण महारांना- अस्पृश्यांना बाटवायला कोटिक्रमच लागते नाही. एकदा त्यांचा हात धरावा आणि कानाला लागावे की, ते बघ तुझे हिंदु कुत्र्याला शिवतात, कुत्र्याला घरात येऊ देतात. त्याला पंचवटीच्या रामाच्या देवळात, पंढरपूरच्या विठोबाच्या देवळात किंवा काशीच्या देवळात शिरून प्रदक्षिणा घालू देतात, पण तुला मनुष्याला घालू देत नाहीत. पुरे, इतके कुजबुजले की विटला तो हिंदु धर्माला. तसेच दुसऱ्या कानात कुजबुजावे की, 'तू मुसलमान हो, की आत्ता तेच हिंदु तुला शिवतील, घरात येऊ देतील , घोड्यावर बसू देतील, नव्हे, तुझ्यापुढे कुर्निसात करितील.' की फिटलाच त्याचा संशय आणि चिकटलाच तो मुसलमानी धर्माला. अशा रीतीने, धर अस्पृश्य की कर मुसलमान, की घे शंभर रुपये छणछण मोजून पारितोषिक म्हणून! असा या मौलवी जाफरअल्लीचा तडाखा चालला आहे. याविषयी मुख्य आभार हिंदु धर्माचेच मानले पाहिजेत. अस्पृश्यतेची रूढि पाडून आणि राखून, हिंदु धर्माने आम्हा मौलवींना हिंदुधर्मनाशाचे कार्यी मनःपूर्वक साहय दिले आहे, हिंदु धर्म कधीही न बुडो, म्हणजे हिंदु धर्म आम्ही हा हा म्हणता बुडवून टाकू. प्रथम अस्पृश्य बाटवावे आणि मग, त्यांच्या संख्याबलाने प्रबल झालेल्या इस्लामाल तत्व म्हटले की तरवार उपसून या तत्वज्ञ ब्राहमणादिकांस मुसलमान बनवावे हे धोरण; हा कार्यक्रम! हे आलंच माझे नवे सावज धावत धावत माझ्या गोळीच्या टप्प्यात.

शंकर : (प्रवेश करून) मौलवीजी, कमलिनी मुसलमान झाली आहे, ही तुमची बातमी खरी आहे ना?

मौलवी : अल्लाची शपथ. इब्राहिमखानाने मला प्रथम तुमची सगळी माहिती सांगितली. कारंज्यावर हिंदु लोकांनी जो छळ केला; तो ऐकून माझे हृदय कासावीस झाले. मी तसाच तुमच्या शोधाला लागलो. तू आणि तुझा तो किसन ह्यांना बांधून चौकीवर आणले असता, मीच मध्ये पडून सोडून दिले. इब्राहिमकडून कमलिनी मुसलमान झाल्याची आणि तुझ्या भेटीची मार्गप्रतीक्षा करीत असल्याची बातमी काढली, आणि तसाच तुला गाठून ती तुला दिली. इब्राहिम इतके देखील म्हणाला की शंकर मुसलमान होते असेल तर, सुभेदार स्वतः त्याचे लग्न कमलिनीशी लावून देऊन, दोघांना एक जहागीरही देणार आहेत. हयातील एक अक्षरही खोटे नाही. (स्वगत) ते खरच. एक अक्षर का, दहा पांच अक्षर खोटी नाहीत. बाकी सगळी खोटी आहेत. पण ती खोटी नाहीत म्हणून मी कुठे म्हटले? एक अक्षर खोटे नाही, इतकेच मी वचन दिले आणि ते खरे आहे.

शंकर : मौलवी, माझ्या मित्राला -त्या किसनला- भेटून, माझ्यासारखेच त्याची समजूत पाडाल का? हे पहा, मी मुसलमान होण्याचा निश्चय, हा काही कमलिनी मिळण्यासाठी केलेला नाही.

मौलवी : क्षमा कर, मध्ये बोलतो याची. परंतु तू अगदी यथार्थ तेच बोललास. कारण जरी तू हिंदु राहून तुला कमलिनी- न बाटलेली कमलिनी मिळाली तर काय? पुन्हा तुम्ही दोघे त्या महारवाड्यातच जाणार ना? म्हणजे हिंदु महार म्हणून, त्या दिवशी तुमचा जो छळ झाला, तो शेकडो वेळा तसाच होणार नाही का? कमलिनीची महारीण म्हणून विटंबना, लुच्चे स्पृश्य हिंदु तुझ्या डोळ्यादेखत तू महार आहेस तोवर करणारच. तेव्हा कमलिनीची एक दिवसापुरती सुटका झाली तरी उपयोग काय? तेच तू, मुसलमान हो की, कमलिनी बिबीसाहेब होऊन ब्राह्मणीच्यापेक्षा जास्त सुखात आणि विलासात जन्मभर लोळेल, तिची जन्माची खरी सुटका होईल.

शंकर : हे तुमच म्हणण सत्य आहे.

मौलवी : शंकर, तुमच्या सर्व छळाचे मूळे कारण म्हणजे तुमची अस्पृश्यता नव्हे काय?

शंकर : निःसंशय.

मौलवी : शंकर, तुम्ही हिंदु आहांत तोंपर्यंत, ही अस्पृश्यता दूर होण्याची काही तरी आशा आहे का?

शंकर : सध्याच काय पण पिढ्यांन्पिढ्या देखील काही आशा दिसत नाही.

मौलवी : मग हा सगळा छळ, हया एका ‘हिंदु’ शब्दाला आपले म्हणून समजणाऱ्या आत्मघातकी भाबडेपणाचाच परिणाम नाही का?

शंकर : अगदी बरोबर.

मौलवी : मग वेड्या, पुसून टाक तो शब्द मनाच्या पाटीवरून, एक यःकश्चित् शब्द! तोंडाची वाफ! आणि त्या यःकश्चित् शब्दासाठी, जन्माचा नाश! सोड, तो शब्द,म्हण, 'हिंदु' नाही- की या वाक्यासरशी तू महारवाड्यांतून मंदिरात येशील. पशूंतून मनुष्यात येशील, प्यादयाचा फर्जी होशील, इतकेच नव्हे तर तुझे इतर अस्पृश्य बंधु, तुझे उदाहरण पाहून मुसलमान होतील आणि तुझ्याप्रमाणेच वैभवाचा उपभोग घेऊ लागतील. तू एका जातीचा उद्धारकर्ता होशील. म्हण मी 'हिंदु नाही'

शंकर : नाही, मी हिंदु नाही! झाला माझा निश्चय, हा पहा, हा हिंदु शब्द मी माझ्या भालावरून पुसून टाकला, -उपजत घुसलेल्या एखाद्या शल्यासारखा हा हिंदु शब्द, या माझ्या हृदयातून उपटून काढला, हा मी पायाखाली तुडवला! बोला, मुसलमान होण्यासाठी काय मुख्य विधि मी केला पाहिजे?

मौलवी : काही एक विधि नको. हिंदु धर्माचा तीव्र निषेध, हाच मुसलमानी धर्मग्रहणाचा मुख्य विधि. तो तू केलाच आहेस. आता हे चार शब्द तेवढे म्हण 'ला इला हा इल्लिल्ला महमद रसूलल्ला.'

शंकर : (ते म्हणून) पण मला याचा अर्थ कळला नाही.

मौलवी : चिंता नाही. तुला हिंदु धर्मात राहण्याचा अनर्थ कळला आहे ना? मग मुसलमानी धर्माचा अर्थ नाही कळला तरी चालेल. परवा तू मशिदीत ये. मी तुला सुभेदारांना भेटवीन. आता तुझ्या त्या किसनची चिंता सोड. अस्पृश्यता सुटताच, हिंदूचा मुसलमान होताच तुझ्या परिस्थितीत केवढा फरक पडला! आणि ईश्वराल तुझी किती भरभराट केली हे पाहताच, न बोलता किसन मुसलमान होईल. आता परवा सुभेदारांच्या परवानगील कमलेची आणि तुझी भेट घालविण्याचे ठरवू. तू मशिदीत भेट. जा आता. आजपासून तू मुसलमान झालास, मनुष्य झालास. तू शंकराचा आता शिकंदरखान झालास, जा.

शंकर : (जाता जाता स्वगत) याचे शब्द माझ्या कानांत कसे बाणासारखे असह्य दुःख देत आहेत. पण पूर्वीच्या त्याच हिंदूच्या 'धेडा धेडा' या शब्दांनी होणाऱ्या असह्य दुःखाला हया नव्या दुःखाचा छेद दिलाच पाहिजे; तेव्हाच दुःखाची बाकी पूज्य उरेल. (जातो.)

मौलवी : अल्ला! आणखी शंभर रुपये पडले माझ्या पदरांत. आता खरे म्हटले म्हणजे कमलिनी मुसलमान झालेली नाही. ती कुठे आहे, हे मला पक्के माहीत नाही. परंतु या गोष्टी खोट्या आहेत हे तरी त्याच्या डोक्यांत कुठे आले? बहुधा थापाथापी करून ते लक्षात येऊ देणार नाही म्हणा आम्ही, आणि आले, तरी माझे शंभर रुपये काही बुडणार नाहीत. शंभर रुपये मला मिळवून देण्यात जसे हिंदु धर्माने साह्य केले; तसेच मिळविलेले शंभर रुपये मजपासून कोणीही हिसकावून घेऊ नये म्हणूनही, हिंदु धर्मच

मला साह्य देईल. हयाला हिंदु धर्मातील अस्पृश्यतेच्या तत्वाने, मुसलमान होण्याला प्रवृत्त करून आयता माझ्या दारांत आणून लोटून दिले. आता त्याला मी लाथाडले, त्याला उपरति झाली, मी सगळ्या गप्पा मारल्या म्हणून हा चिडला आणि म्हणाला की, 'मी होतो पुनः हिंदु' तरी हयाला जन्मभर माझ्या घरात कोंबून, मुसलमानाचा मुसलमान ठेवण्याचे कार्यही, आता तोच हिंदु धर्म करील. मौलवींच काम म्हणजे केवळ आलेल्या हिंदूस कलमा पढविणे, बाकी सर्व काम हिंदु लोक आपण होऊन करितात. गर्भातून आलेला बालक जसा पुनः गर्भात जाऊ शकत नाही, तसा हिंदु लोकांतून कोणी एखादा मुसलमान झाला की तो पुनः त्यांच्या समाजात जाऊ शकत नाही! अस्पृश्यता त्याला हिंदु धर्माचे बाहेर ढकलते आणि पतित तो पतितच म्हणून अंगिकारलेले अपरावर्तन हिंदु धर्माचे दार त्याला कधीहि परत उघडीत नाही. हिंदू धर्माच्या दारातून वाटेल तो बाहेर जाऊ शकतो, पण आत मात्र कोणी येऊ शकत नाही. तेव्हा आता देवा! अल्ला! हया हिंदु लोकांस दोन गोष्टी करण्याची बुद्धि तू कधीच देऊ नकोस. अस्पृश्यतानिवारण आणि शुद्धि हया दोन गोष्टी, हिंदु लोक जोवर करीत नाहीत, तोवर मुसलमानी सत्तेची आणि प्रसाराची भरभराटच होते जाणार!

प्रवेश ३ रा

पद- १३

(नाच)

वारांगना : भोगिनिया घे घे, फुलत्या गे तारुण्याला ।

रति रंगा लुटि जो । अनंग हा संचारला ।

गुंफिये जो वसंत तो कुसुमासि माळिणि झणि गे ।। ध्रु.।।

जग भारि चंचल? मुग्धे । म्हणोनिची भोगुनि

झणि ते ।। देवा हि न करमे त्याविणे, रचि पुन्हा त्याते ।

जा रे दूरि उद्या, जवळि ये रम्या सद्यां ।

मद्या पिई, गीता गाई, आलिंगि या मदनावेगे ।। १ ।।

गंगाजी : कमले! काय बाई, ही निजली देखील! ह्या माझ्या काममंदिरांतील विलासी संगीताने, समाधि लागलेल्या रोग्याची देखील झोपमोड होते, तिथे हिला झोप लागली! आजपर्यंत मी नानाप्रकार हिला इथे रमविण्याचा प्रयत्न करीत आले; पण हिला माझ्या या सर्व भोगांचा, कसा अगदी उदास कंटाळा वाटते असतो. पण स्वभाव किती गोड म्हणून सांगावा! मी बोलून चालून वेश्या. माझ्या दैहिक सौंदर्याने आजपर्यंत हजारो जणांना मोहित करून टाकले असेल. पण हिच्या आत्मिक सौंदर्याने आज त्या मलाही मुग्ध करून सोडले आहे; कोण म्हणेल, ही महाराची मुलगी म्हणून! ह पण ह्या माझ्या वाक्यात देखील, मी हे गृहीत घेतलंच की, महारांत अशी सुंदर आणि सच्छील माणस निपजणे कठीण! जसा काही तशी माणस निपजण्याचा मक्ता ब्राह्मण क्षत्रियादि वर्णांनाच मिळालेला आहे! तरी बरे, मी स्वतः मराठ्याची मुलगी आहे! आणि बालपणी वैधव्याच्या गर्तेतून वर निघण्यासाठी वेश्येच्या हाताचा आधार घेण्यालाही मागंपुढे पाहिले नाही! महाराच्या कुळात अशी सच्छील पोर निपजली हे आश्चर्य नाही. मराठ्यांच्या कुळात माझ्यासारख्या वेश्या निपजतात हे खरे आश्चर्य! खरे पाहिले असता, हया माझ्या वेश्यामंदिरात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, महार, मांग, हिंदु वा मुसलमान, जो कोणी येईल त्याची जात गोत न विचारता, मनुष्य म्हणून स्वीकारला जातो. जातीगोतांची सोंगे, वस्त्रे उतरून ठेवावी तशी टाकून, मनुष्य जसा असतो तसाच, वेश्यागारात प्रकट होतो. त्याचप्रमाणे हजारो प्रसंगी तो, तो, प्रकट झाला असता,

जातिभिन्नताप्रदर्शक वैधर्म्य, ज्या मला कोणांतही निसर्गतः असलेले आढळल नाही त्या महारात अशी पोर निपजावी याच आश्चर्य वाटाव, हे मात्र खरे आश्चर्य होय! लहानपणचे संस्कार मनाला असे नकळत चिकटून राहतात. झाली वाटते जागी? कमल ऊठ बाळे, आज आता खातेस ना थोडेसे! (कमला उठते) कमले, आम्ही वेश्या-प्रीतीचा आव आणण्याचा सराव आम्हाला असतो हे खरे, पण तुला देवाची शपथ घेऊन सांगते की, तुझ्यावर मी पोटच्या पोरीसारखे प्रेम करीत आहे.

कमलिनी : (स्वगत) काय करू? वास्तविक या वेश्येच्या अंगाशी लगटण्याची मला कशी किळस येत आहे. पण हिच्या या प्रेमळे शब्दाच्या मृदुल पाशात माझे हृदय जवळ जवळ धरले गेले आहे. (उघड) मला थोडे पाणी पाहिजे आहे.

गंगाजी : होय ना, आता आणते जाऊन बाळे, असे तू होऊन काय ते माझ्यापाशी मागितलंस ना, म्हणजे फार आनंद होतो मला. (तिच्या तोंडाला कुरवाळते आणि पाणी आणायला जाते.)

कमलिनी : देवा! मी कुठे येऊन पडले आहे!

पद - १४

प्रभू कुठे विमल मधु, पुण्यती, फुलवाडी ।

जीमधे जीवाची मम मालती फुलली ते ।। ध्रु.।।

आणि नरकवाडी, गदळे ही, तृष्णेच्या कृमीमधे ।

मी पडे जिथे आज ते ।। १ ।।

त्या मेल्यांनी कारंज्यावरून पळवून मला इथे लपवून ठेवले आहे. माझा किसन कुठे असेल? माझा शंकर कुठे असेल? माझा शोध करीत वणवणे हिंडत असतील. माझ्या प्रियकराची आठवणे होताच, माझे हृदय दुभंग होऊ पहात आहे. मला आता कोणाच्या तरी गळ्यात पडून, पोटभर रडावेसे वाटते आहे.

गंगाजी : (प्रवेश करून) हे काय? डोळे का पुसते आहेस? कमले, हे घे पाणी, रडू नको अशी. तुला तुझ्या प्रियकराची आठवणे होते आहे, नाही? कमळे कोणा तरी प्रियजनाला दुःख सांगावे असे तुला वाटते नाही? कमळे, आम्हा वेश्यांना इतरांचे मनोविकार मुद्रेवरून ओळखण्याची आवश्यकता वारंवार पडत असल्याने, दुसऱ्यांच्या भावनांशी समरस होण्याची, आमच्या सहानूभूतीची शक्ति सहजच फार विकसित झालेली असते. ती सहानुभूति आम्ही लपवू शकतो. दाबू शकतो, पण मारू शकत नाही. म्हणून, बाळे, तुला

पाहताच मी समजले की तुला कोणाला तरी आपले म्हणावेसे वाटू लागले आहे. ते पहा, तुझे दुःखी प्रेमाने फुरफुरणारे ओठ आणि गाल! तुला कोणाच्या तरी पोटाशी लगटून, गळ्यांत पडून रडावंस वाटते आहे? ये, ये तर! (कमला तिच्या गळ्यात पडून स्फुंदून स्फुंदून रडते.) पड अशी माझ्या गळ्यात हे बध, तू मला आई मान म्हणून मी आग्रह करीत नाही. कारण त्या तुझ्या पवित्र आईचे नांवावर माझी सावली पडल्याले ते विटाळेल. परंतु तू जरी मला आई मानीत नसलीस तरी, कमळे, मी तुला आपली मुलगी मानली आहे. म्हणून तरी तुझ्या प्रेमावर माझा थोडा अधिकार तू मानावास.

कमलिनी : गंगाजी, हे तुमचे अत्यंत जिव्हाळ्याचे शब्द, अमृताच्या बिंदूसारखे, माझ्या प्रिय वियोगात तृषित आणि तप्त झालेल्या मनाला, गोड वाटते आहेत. मी आज सर्वस्वी तुमच्या हातात आहे. मी मुलगी म्हणून न मानता बटीक म्हणून जरी ठेवले तरी मला काही प्रतिकार करता येणे शक्य नव्हते, असे असता, तुम्ही ज्या अर्थी आजपर्यंत मला आईसारख्या प्रेमाने वागवीत आल्यात त्या अर्थी तुमच्या प्रीतीविषयी माझ्या मनातील विकल्प मावळत चालले आहेत. यात काही आश्चर्य नाही, मला आता मायेचे कोण उरले आहे? ते आता तुम्हीच आहात. खरे सांगू का, मला तुमच्या मंदिराची, निवासाची, वर्तनाची येथे येणाऱ्या माणसांची, येथील वासाची, विलासाची, रूपाची, प्रत्येक, प्रत्येक वस्तूची, किळस येत आहे. क्षमा करा मला, पण-

गंगाजी : कमल, तुला क्षमा करायच्या इच्छेपेक्षा, तुझीच क्षमा मागायची इच्छा माझ्या हृदयात उसळत आहे. कमळे, तू जे शब्द बोलते आहेस, ते शब्द मला नव्यानेच ऐकू येत आहेत, असे नाही. हे पहा माझ्या हृदयाच्या ज्या मंदिरात मी राहत असलेली तुला दिसते आहे त्या या काममंदिराची तुला किळस आली आहे. परंतु माझ्या या हृदयभवनात हे एकच मंदिर आहे असे नाही. त्याच्यावर आणखी एक भावमंदिर आहे. त्यात एक दैदीप्यमान देवता निवसत असते. माझ्या हृदयभवनातील तेच देवघर होय. तेथील तेजाने माझे हे चर्मचक्षु दिपतात. म्हणून मी त्या देवमंदिरात न जाता बहुधा काममंदिरातच माझ्या दृष्टिला झेपेल इतकाच परिमित प्रकाश पाडणारी ही काचेची भौतिक झुंबरे लावून राहत असते. तथापि त्या माझ्या हृदयभवनातल्या देवघरातील देवतेचे शब्द तिथेही माझ्या कानावर मधून-मधून येऊन पडतात. ते शब्द, जे तू बोललीस, तीच भाषा बोलतात, आज कित्येक दिवस तू, हया अप्सरांसही दुःसाध्य अशा उपभोगांचा धिक्कार करीत, अन्नपाण्यालाही विटलेली होऊन, केवळ आपला हिंदुधर्म कसा राखता येईल, या विवंचनेन झुरते बसलेली जेव्हा जेव्हा पाहते, तेव्हा तेव्हा माझ्या विनंतीचा तू अव्हेर केलास याविषयी मला राग न येता, तुझ्या या धर्मभक्तीचा आदरच वाटू लागतो.

पद - १५

गमसी ग माते । देवीची तू मूर्ति ।। ध्रु.

हृदयातील मम देवघरातील पुण्य सतेजा ते ।। १ ।।

कमलिनी : गंगाजी, तर मग तुम्ही माझ्या हया निर्धाराचा भंग करण्याचा प्रयत्न यापुढे करणार नाही ना? गंगाजी, मला धन नको, मान नको, माझ्या प्रियकराची पुनः मला भेट घडविली नाहीत; तरी, चालेल. एक वेळ माझ्या लज्जेचा बळी पडला तरी चालेल, पण त्या दुष्ट इब्राहिमखानाचा किंवा कोणत्याही मुसलमानाचा स्पर्श माझ्या कौमार्याला अपवित्र करू शकू नये. इतके दान मला द्या. त्या दिवशी ज्या ब्राहमणाने मला इथे पळवून आणले--

गंगाजी : त्या नराधम नारंभटाच नाव काढू नकोस!

कमलिनी : नराधम खराच पण तरीही अधमाधमपणा त्याने केला नाही, हेच मी आपणांला सांगत होते. त्याने मला पळवून आणताना वाटेत जेव्हा इब्राहिमखान बिलगू लागला तेव्हा, त्याला साफ उलटून उत्तर दिले की, जर तू या हिंदु मुलीला तिच्या इच्छेविरुद्ध बाटवशील तर, मी आत्ताच्या आत्ता जाऊन सुभेदार बंगषखानाला ही वार्ता कळवीन, आणि तुझ्या तावडीतून हिला सोडवीन, इब्राहिमला सुभेदाराला न कळत मला ठेवायची आहे. कारण सुभेदाराला मी दिसताच, तो मला स्वतःच्या भोगासच बळी देईल, अशी इब्राहिमला धास्ती आहे. तेव्हा तो मागे सरकला. त्या ब्राहमणाला तुम्ही आता नराधम म्हणालात, त्याने माझी विटंबना केली, पण त्या नराधमाने देखील, मुसलमानाला माझी विटंबना करू दिली नाही. ज्या अर्थी आपण त्या ब्राहमणाला नराधम म्हणण्याचा अधिकार बाळगता, त्या अर्थी आपण तरी मला, मुसलमानाच्या वाऱ्याचाही विटाळ होऊ देणार नाही, अशी मी आशा बाळगते, विजयनगरच्या राज्यात, कोणा एका सोनाराची पोर त्या हिंदु राजाला सोडून, मुसलमान राजाला वश झाली, म्हणून माझी आई मला गोष्ट सांगे लहानपणी आणि तिची निंदा करून म्हणे, एखाद्या मुसलमान बादशहाल जर मला वरू पाहिले, तर मी एखाद्या हिंदु भंग्याचा हात धरीन, पण त्या अहिंदू राजाच्या तोंडाकडे थुंकून देखील पाहणार नाही! त्या आईची मी मुलगी आहे. माझे हे कुलव्रत, हा माझा हिंदु धर्म आपण रक्षण करा! आपणही, गंगाजी हिंदु आहात.

गंगाजी : अर्थात् कमलिनी, तुझ्या हया उज्ज्वल व्रताचे सिद्धीसाठी मी जिवात जीव आहे तोवर झटते. काय सांगू, कमल, तुझे शब्द ऐकून मला काही विसरलेले आठवावे, हरवलेले आठवावे, चुकलेले भेटावे,

तसे होते आहे. हिंदुधर्म! खरच, मुली,आपण हिंदु आहोत नाही? आता करुणेनंच नव्हे तर, कर्तव्य म्हणूनही, त्या पंढरपूरच्या कोतवाल इब्राहिमपासूनच काय, पण प्रत्यक्ष त्या बंगषखानापासूनही मी तुझे पावित्र्य रक्षण करीन. माझ्या करामतीपुढे त्याचे हजारो डावपेच हताश करून टाकीन. त्याची गजान्त लक्ष्मी यापुढे मला लुब्ध करू शकणार नाही. हे हिंदु कन्ये, हे माझे एका हिंदु वेश्येच हृदय, तुला हात देत आहे. हा हात अनेक पापांनी मळलेला आहे. पण तो धरायला तू दचकू नकोस! तो मळ चर्माला मात्र लागलेला आहे. आतल रक्त, मांस, मज्जा आणि प्राण अजून निर्मळे आहेत. हिंदूचे हिंदु आहेत. त्यास तुझ्या हिंदुत्वाचे रक्षणार्थ आहुति देऊन मी स्वतः त्या हिंदुत्वाच रक्षण करीन.

कमलिनी : बाई, तुमचे मजवर अनंत उपकार आहेत.

गंगाजी : वेडे मुली, उपकार आताच मानू नकोस, आम्ही वेश्या! आमच्या बोलाचा खरा अर्थ, आमच्या कृत्यानंतर कळत असतो. तेव्हा पूर्तीनंतर वचनाचे आभार मान. ये- मला अशी लगटून भेट, खऱ्या प्रेमाची भेट मला फार दिवसांनंतर लाभू दे आणि रागावू नकोस. पण-

पद-१६

हे मुली मला मुका, घेउं एक देशील का ।

स्पर्शे विषय हलाहलाचिया जळते ।

आजि ओंठ निवू देई ते । तव मुखचंद्राच्या-वत्सल रस ।

देत पिवू पानाते ।। १

अहाहा, हे महाराचे मुली, आजपर्यंत अलिगिलेल्या स्पृश्यांच्या पापस्पर्शाने बधिर, कपटी आणि निर्दय झालेल हे माझे हृदय, हे महाराचे मुली, तुझ्या या अस्पृश्य स्पर्शाने आज प्रथमच, पुण्य स्पर्शाच सुख किती दिव्य असते, ते अनुभवीत आहे! माझ्या हृदयाला आज खरी दया स्पर्शली! यापुढे तू प्रेमळे नावाने हाक मारावीस असे वाटू लागले आहे. तर तू मला ताई म्हणशील का?

कमलिनी : होय, चल तर ‘ताई.”

प्रवेश ४ था

स्थळ : पाटलाचे घर. (नारंभट पुराणाची पोथी घेऊन येतात.)

नारंभट : अजून का बरे येत नाही ही मालिनी पुराण ऐकायला? या पाटीलबुवांचे घरी जेव्हा आमची कुलगुरू म्हणून, या तरुण पाटलिणीला - या मालिनीला- पुराण सांगण्याचे कामावर योजना झाली, तेव्हा मनात एकच धाक वाटे की, पाटील तर पाटलिणीबरोबर पुराणाला येऊन बसणार नाहीत ना? पाटलीणबाईंनी परस्परच त्या संकटाचा परहार केला. अता ही तिची म्हातारी मावशी- जी तिच्याबरोबर येते ती- तेवढी टाळता आली पाहिजे, की पुराणाची सांगता झालीच. माझ्या मनात टिपणाशी, या मालिनीच्या मनाच टिपण जुळल आहे, यात शंकाच नाही. आता केवळ एकान्ताचे बोहोल्यावर चढायचा विलंब, की हिची माळ घेतोच घालून या गळ्यात! आज ती म्हणालीच होती. मावशीला टाळून येते म्हणून- पण अजून- अरे आलीच ती! हात्तेच्या, पण तिच्यामागे ती थेरडी येतेच आहे! एवढ बरे आहे की ही आहे भोळसरच. तिला त्यातील रहस्य काही उमगत नाही फारसे!

म्हातारी : काय पुराणिक बुवा, आज नवीन काव्य आरंभायचे आहे ना?

नारंभट : (तिच्याकडे न पाहता नि उत्तर न देता) काय, बरे आहे ना? मुहूर्त सापडला का?

मालिनी : हो, हो, विचारायलाच येत होते की, वेळ झाली का पुराणाला आरंभ करायची?

नारंभट : हो, तर, आपल्या या मुखचंद्रम्याच्या उदयाची प्रतीक्षा करीत होतो. कामिनीच्या शीतल वदनचंद्राचा उदय हाच, रूपावलि नामक जे काव्य, आज आपण आरंभणार आहोत, त्याच्या पठनाला एकमात्र मुहूर्त सांगितलेला आहे. कोणचे काव्य काढू? पंच महाकाव्यांत अग्रगण्य समजल गेलेले, रूपावलि की समासचक्र?

मालिनी : मग ते रूपावलि काव्यच वाचायचे!

नारंभट : बरे. (सगळे पुराणाच्या गळ्यावर) ॐ श्रीगणेशाय नमः । आता रूपावलि काव्य आरंभ होते असल्याने, हे कामिनी, तू मजकडे चित्त लावून पाहत रहा, मावशी, थोडे मागे, पोथी आहे. रूपावलि नावाची गोपी पूर्वजन्मी एका क्षत्रियाची गृहिणी होती, ऐकलंत ना? गृहिणी होती. तिने योगायोगाचे प्रतापे जेहेत्ते, प्रतापे एका ब्राह्मणाच मन मोडले तेव्हा, तिला भयंकर शाप झाला.

मालिनी : पण हे सगळे गद्य आहे, पद्य नाही का? मला लहानपणापासून संस्कृत श्लोक ऐकण्याचा फार नाद आहे. तेव्हा ज्या काव्यात संस्कृत श्लोक असतील, त्यातला निदान एखादा तरी म्हणावा.

माझ्या वडिलांना संस्कृताचा मोठा नाद असे. ते म्हणत, रूपावलि हे काव्य नि त्यातील श्लोक फार गोड आहेत.

नारंभट : तुझे वडील देखील, रूपावलि हे काव्य आहे म्हणून म्हणत ना? तर मग ते एक माझ्यासारखेच संस्कृताचे जाडे पंडित असलेच पाहिजेत! हे ललने, संस्कृताचा एक श्लोक काय, पण शतसहस्त्र श्लोक मुखोद्गत येत आहेत. परंतु स्त्रिया आणि शूद्र यांच्या पुढे त्यातील काही श्लोक म्हणायचे नसतात. (स्वगत) काय करावे, मला एक म्हणता एक देखील श्लोक आठवेनासा झाला आहे. (उघड) अग, सुलोचने, या रूपावलि काव्यात वेदान्तविषयक श्लोक फार, ते स्त्रियांसमोर कसे म्हणूं? (स्वगत) आठवला रे आठवला, एक श्लोक आठवला. (उघड) तथापि त्यांतील एक अवेदान्तविषयक तुला म्हणून दाखवितो, जरा पुढे या, म्हणजे नीट ऐकू येईल. (दोघी पुढे येतात, पण म्हातारीला दाबतो.) ह, इतके पुढे नाही, पोथी आहे. आता रूपावलि काव्य आरब्धायति! (श्लोक म्हणतो.)

सुमुखश्चैकदंतस्य कपिलो गजकर्णकः ।

लंबोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिपः ।।

मालिनी : इश्श, हाच का श्लोक? हा श्लोक तर माझ्या वडिलांच्या घरासमोर लहान लहान भटांची पोर देखील म्हणत असते.

नारंभट : म्हणतच ना? अग म्हणायचे काय, अग, पोपट नाही का रामनाम म्हणत? खरे महत्व, खरे सौंदर्य, हे सुंदरी, अर्थात आहे. त्यांना अर्थ थोडाच समजत होता! ऐक, या सुंदर श्लोकांचे एकंदर तेरा अर्थ करण्यात येतात, त्यांपैकी एक ऐक. अग लावण्यलतिके!

मालिनी : इश्श, असे येता जाता माझ्या लावण्याच्या लतिकेवर चढण्याचा प्रयत्न करणे बरे नव्हे, म्हटले! पाय घसरून दांत पडायचे एखादे वेळी!

नारंभट : काही हरकत नाही, कामशास्त्रात म्हटलंच आहे की, “दंतच्छेदो हि नागानां श्लाघ्यो गिरिविदारणे” - याचा अर्थ सांगू?

मालिनी : पण त्या श्लोकाचा अर्थ सांगावा आधी. कामशास्त्राच्या श्लोकाचा अर्थ आपोआपच हळूहळू कळू लागला आहे मला.

नारंभट : ‘सुमुखश्चैकदंतस्य कपिलो गजकर्णकः’ एकदा जेहेत्ते काय झाले की, हे सुमुखी, कपिल नांवाच्या ऋषीला शंकराल शाप दिला की, तू रोगाक्रांत होशील. तेव्हा, कळत ना तुला?

www.savarkarsmarak.com

मालिनी : थोडे शब्द फोडून सांगावे.

नारंभट : सुमुखे! एकदा, तस्य कपिलो गजकर्णकः म्हणजे, हे सुमुखे एकदा काय झाले की, ‘तस्य कपिलो’ म्हणजे त्या कपिल ऋषीच्या ‘लंबोदरस्य विकटो’ म्हणजे ढेरपोटाच्या अगदी खालीच. कटौ म्हणजे कटीला, ‘गजकर्णकः’ म्हणजे जेहेत्ते भयंकर गजकर्ण झाले! काय सांगावे ते दुःख! आग! आग! त्या ऋषीला झालेल्या त्या गजकर्णाच्या आगील त्याच्या अंगाची लाही लाही होऊ लागली! -कपिलो गजकर्णकः! ! (म्हातारीस) ह दूर म्हणून सांगितले ना? किती पुढे येता तुम्ही, पोथी आहे. मी कसा आसनस्थ बसलो आहे, असे स्थिरासन घालून बसावे. (पडद्यातून हाका मारतात.) मावशी. अहो मावशी, पाटीलबुवा हाका मारताहेत.

मावशी : जाऊ का थोडीशी?

नारंभट : हो, हो तर थोडीशी का? सगळ्याच्या सगळ्या जा. पाटील बुवा बोलावताहेत. उभे पंढरपूर त्यांचा शब्द झेलीत असते (मालिनी उठू लागली हे पाहून) ह, ह, हे काय? अध्याय अर्धाच टाकून का कुणी तरुण मुली पुराणातून उठत असतात? आता जो अध्याय मी सांगणार आहे तो, मावशींनी आपल्या आयुष्यात पूर्वीच वाचून टाकला आहे. तेव्हा मावशी गेल्या तरी चालतील.

मावशी : बैस बाळे, मी आलेच आता. (जाते.)

नारंभट : (स्वगत) ह, हीच निर्वाणीची वेळ! शापादपि शरादपि ब्राह्मणाचा बच्चा आहेस, नारंभट, कर धीर! (मावशी गेली हे पाहून) गेली का मावशी? असेल हो तिथे कुठे?

मालिनी : असे ना? तुम्ही आपले त्या स्थिरासनावरून, बसून पुराण सांगा, म्हणजे झाले. ती गेलीच आहे.

नारंभट : तेव्हा रूपावलि नांवाची गोपी, काय तिचे सौंदर्य सांगावं- अग, हनुवटी म्हणजे (तिच्या हनुवटीस हात लावण्याला सरकतो)

मालिनी : ह जरा मागे बसावे, पोथी आहे! (मागे सरते.)

नारंभट : (पोथी दूर सारून उभा राहतो) मालिनी! लावण्यशालिनी! ही बघ पोथी, त्या मावशीसारखी दूर सारून दिली, आता तुझ्या माझ्यामध्ये, न मावशीची आडकाठी, न पोथीची. आता तर जवळ - अगदी - जवळ - यायला काही हरकत नाही ना?

मालिनी : असे काय अगदी अंगाशी लगटायचे? मी क्षत्रियाची मुलगी, आपण ब्राह्मण!

नारंभट : अग म्हणूनच तर, आपल्या प्रीतिसंगमाला शास्त्राची मुळीच हरकत नाही. ह्यालाच तर अनुलोम आणि प्रतिलोम पद्धति म्हणतात.

मालिनी : म्हणजे काय?

नारंभट : अग वेडे, अनुलोम म्हणजे, जर एखाद्या ब्राह्मणाचे प्रेम एखाद्या क्षत्रियेवर बसले आणि तिचंही त्या ब्राह्मणावर प्रेम असले (स्वगत) अहाहा, काय पण लज्जावती आहे? ती माझी लाडकी, किंचित् तोंड फिरवल्याले, ते मुरका मारलेले मुखकमल किती शोभत आहे. (उघड) आणि जर ती ती क्षत्रियकन्यका केवळ संकोचाल त्या ब्राह्मणाला एकान्तात पाहून, अन् किंचित् पाठमोरी होऊन उभी राहील तर त्या ब्राह्मणाने तिच्याशी अनुलोम विवाह करावा. लोम म्हणजे केस आणि अनु म्हणजे मागून, म्हणजे असे तिच्या केसामागून म्हणजे लज्जेल वळवलेल्या पाठीमागून जाऊन असे तिच्या मुखाचं घ्याव, आणि तिने ते द्यावे.

मालिनी : पण अर्थ म्हणजे आचार नव्हे. ते करून न दाखवताही, मला अर्थ कळेल. आता प्रतिलोम म्हणजे काय? पण दुरून बोला हो जरा.

नारंभट : सांगतो. अनुलोम आणि प्रतिलोम, दोन्ही विवाहपद्धति सांगतो. मग तू त्यातून वाटेल त्या पद्धतिने माझा स्वीकार कर. अनुलोम पद्धतिने केसामागून येऊन, म्हणजे पाठीमागून येऊन, पाणिग्रहण केले असताही, जर ती क्षत्रिय सुंदरी त्या आपल्या आवडत्या ब्राह्मणाला, लज्जेल पुन्हा वरवर म्हणाली की, दुरून बोला हो जरा, आणि स्त्रीसुलभ प्रणयकपटाने पुढे जाऊ लागली तर, त्या परिस्थितीत तिच्याशी प्रतिलोम पद्धतिने विवाह लावावा. प्रति म्हणजे तिच्याप्रति आणि लोम म्हणजे लोमकळण, अर्थात् असा गळ्यात हात टाकून अगदी गळी पडण, अनुलोमात पाठीमागून येऊन तिचे पाणिग्रहण करायचे - आणि प्रतिलोमात, छातीठोकपणाने पुढून, हा त्यात मुख्य भेद आहे. या प्रतिलोम विवाहानंही जिच मनोरंजन होते नाही, अशी कामिनीच विरळा - खऱ्या क्षत्रियाच्या पोटची पोर, कधीही प्रतिलोमाला वश झाल्याविना रहात नाही. (हे सर्व पुराणाचे गळ्यावर म्हणत, तिच्या गळ्यात हात घालू पाहतो; इतक्यात मावशी प्रवेश करिते.)

म्हातारी : (नारंभटाच्या पाठीमागे येऊन) अगबाई हे काय पुराणिकबुवा? ते मघा मला सांगितलंत तें-स्थिरासन सोडून तुम्ही इथे कसे आलात? आख्यान संपले की काय?

नारंभट : अहो, संपले कसचे? आताच आख्यानाला आरंभ होते होता तोच एक गोम निघाली त्यात. ही इथे होती, मालिनीबाईंना डसली असावी असे वाटते.

मालिनी : डसली नाही डसत होती मेली! ही इथे, इथे कुठेशी केवढी मोठी गोम होती म्हणून सांगू?

म्हातारी : (टुणकन उडी मारून) अगबाई! अहो गोम कसली, साप असेल साप! राम्याला तरी बोलवा. अहो पाटील, अरे राम्या, धावा!

(पडदा पडतो.)

प्रवेश ५ वा

स्थळ - (पाटलाच्या घरापुढील रस्ता).

शंकर : (स्वगत) आलाच तो किसन पहा! मी मुसलमानीपणा स्वीकारल्यापासून, या किसनने माझे तोंड देखील न पाहण्याची प्रतिज्ञा केली आहे! पण त्याच्यावरचा माझा लोभ काही अजून कमी झाला नाही. हा माझा बालमित्र, जिच्या प्रेमाने वेडा होऊन आज मी मुसलमानीपणा स्वीकारला- होय, केवळ मुसलमानीपणाच! कारण मुसलमानी धर्म मी स्वीकारला, असे काही मला म्हणता यायचे नाही! त्या धर्माची मला पुरती माहिती नाही. जी झालेली आहे तीवरून त्या धर्मात, आमच्या महारांचे संत चोखामेळा जो उपदेश देत आणि तत्वज्ञान सांगत, त्यातील उदात्तपणाचा लवलेशही आढळून येत नाही. म्हणून म्हणतो मी मुसलमानी धर्म स्वीकारला नसून, हिंदूच्या जातिभेदाच्या छळापासून संरक्षण होण्यापुरता मुसलमानीपणा स्वीकारला. तो जिच्यासाठी स्वीकारला, ती माझी लाडकी कमलिनी, तिचा हा भाऊ म्हणून किसनवरचा माझा लोभ अजून कमी झालेला नाही. यालाही मुसलमानीपणा स्वीकारायला लावून, त्याला अस्पृश्यतेच्या कलंकापासून मुक्त करावं- अशी मला मनापासून इच्छा आहे. ती पुरी करण्याचा आज आणखी एक प्रयत्न करू, आज हा, या पंढरपूरच्या संभाजीराव पाटलाचे, कमलेच्या शोधाच्या कार्यी, साह्य मागायला येत आहे. येथे त्याला 'हिंदु महार' म्हणून कसे वागवितात आणि मी 'बाटगा' म्हणून मला कसे वागवितात; हे प्रत्यक्ष रूपाने त्याचे निदर्शनाला आणून देऊ म्हणजे तरी, त्याला हिंदु समाजात राहण्याची किळस येऊन, त्याचे डोळे उघडले तर उघडतील! आलाच तो. असे बाजूल आपण पाटलाच्या अंगणाकडे जावे. (जातो.)

प्रवेश ६ वा

(आतील पडदा उघडतो - पाटलाच्या ओसरीवर पाटील नि कारभारी बसले आहेत.)

संभाजी : काय हो, कारभारी. चोख्याच्या विरुद्ध माझ्याकडं शेकडो गाऱ्हाणी येत आहेत. नारंभटाना मी त्याची बहुतेक माहिती विचारली. त्याला पंढरपूरच्या देवळाच्या वाटेवरून लोकांनी हुसकून दिले, असे भिकूशेटसुद्धा म्हणाले.

कारभारी : म्हणाले काय? स्वतः त्यांना देखील त्याला धक्के मारल्याविना राहवले नाही. अहो, भ्रष्टाचार माजवला आहे या धेडांनी आजकाल! आता तर त्या चोख्याला वेड लागायाच बाकी उरले आहे. तो सर्व महारांना सांगत सुटला आहे की, आता प्रत्यक्ष देव येऊन मला प्रसाद देणार आहेत!

पाटील : खरे की काय? आम्हा क्षत्रियांची उच्च घर सोडून, या धेडाच्या घरी देव येणार आहेत! पाजी कुठला? असे सांगतो अं? याची जीभ उपटून काढली पाहिजे! अशा थापा मारून हा महारांना आम्हा उच्चवर्णीयांचा तिरस्कार करायला शिकवीत आहे. नाही?

किसन : (प्रवेश करून) जोहार मायबाप.

पाटील : कोण आहेस रे तू?

किसन : मायापूरचा महार आहे महाराज.

पाटील : आणि इतका पुढे येऊन उभे राहयला तुला लाज नाही वाटते? मायापूरचा असे नाहीतर ब्रह्मपूरचा असे, धेड तो धेड. हट, मागे हट!

किसन : हटतो मागे, महाराज. पण मला एक फिर्याद सांगावयाची आहे. म्हणून, माझा शब्द आपणाला ऐकू येईल इतक्या अंतरावर तरी, मला उभे राहू द्यावे. हे पहा, माझ्या बहिणीला येथील काही लोकांनी, मारहाण करून पळवून नेली आहे.

शंकर : (एकाएकी किसनच्याही पुढे घुसून) पाटील?

कारभारी : अरे, मागे हट, तूंही महारच ना? आता त्याच्या मागे अगदी उभा होतास.

शंकर : होय, मी महार.

पाटील : पाठीवर कोरडे ओढा चोराच्या; चल हो मागे, दांडगाईल पुढे घुसतोस? दांत पडतील.

शंकर : ह! म्हणूनच तोंड मिटा. मी महारपणात जे लज्जास्पद होते, ते टाकून दिले आहे. मी कालपर्यंत किसनसारखाच हिंदु महार होतो. पण ते लज्जास्पद हिंदुत्व काल टाकून, मी मुसलमान झालेला आहे. मला सुभेदारांनी या सत्कृत्याविषयी, शिपायांच्या वरचा नाईक केलेला आहे; आणि सुभेदारांचा निरोप सांगण्यासाठीच; मी तुमचेकडे आलो आहे. मी आता हिंदु महार नाही. तेव्हा आता माझी सावली, आपणांसारख्या हिंदूच्या अंगावर पडली, तर विटाळ होतो की नाही; ते स्पष्ट सांगा.

पाटील : मुसलमान झाला आहात ना तुम्ही?

शंकर : स्वतः सुभेदार बंगषखानाच्या देखत झालो.

कारभारी : मग तुमच्या सावलीला कसला विटाळ?

पाटील : भलतेच मुसलमान झाल्यावर कसला विटाळ? या, या नाईक, या बैठकीवर या.

शंकर : पण मी आपल्या 'हिंदु महाराचा' मुसलमान झालेला आहे.

पाटील : असा ना! मुसलमानाला शिवायला किंवा त्याच्या मांडीशी मांडी लावून बसण्यात आम्ही हिंदु लोक मुळीच विटाळ मानीत नाही. या बसा असे. महारादिक जे अस्पृश्य आहेत ना, त्याचे बीज, रक्त, हे सर्वत्र पूर्वार्जित कुसंस्कारांनी दूषित झालेले असते.

शंकर : परंतु तेच महाराचे रक्त, बीज, आणि मांस, अजूनपर्यंत माझ्या अंगात जसंच्या तसेच आहे एक अणु देखील बदलला नाही.

कारभारी : त्या व्यतिरिक्त, हे महार लोक फार गदळे असतात. त्यांचे खाणे पिणे अत्यंत ओंगळ!

शंकर : परंतु हा किसन ज्या महारवाड्यात राहतो, त्या महारवाड्यात बहुतेक महारांनी वारकऱ्याची माळ घेतलेली असून, या किसनच कुटुंब तर, लसूणदेखील खात नाही. मग मांसमच्छराची गोष्टच नको. ते प्रत्यही स्नान करतात, भजन करतात- त्यांच्या सगळ्यांत जर कोणी गदळे असेल, तर तो मी होतो. आणि महारपणाच्या गदळपणाचा जितका मळ, मी काल हिंदु होतो तोवर माझे अंगावर साचलेला होता, तो अजूनपर्यंत तसाच आहे. कारण मी मुसलमान झाल्यानंतर स्नान देखील केले नाही अजून.

पाटील : त्यातही हे धेड मृतमांस- मेलेल्या गाईच मांस खातात.

शंकर : पण आपल्याला सांगितलंच मी आत्ता की, लसूण किंवा कांदा न खाणारे, व्रतस्थ सात्विक महार असतात; त्यांतही मी हिंदु महार होतो. तोवर, मेलेल्या गाईच मांस क्वचित्- खात नव्हतोच- खातांना पहात होतो- परंतु काल मी मुसलमान झाल्यापासून जिवंत गायीच मांस खाऊ लागलो आहे.

पाटील : काय थट्टा मांडली आहात, नाईक! अहो जिवंत गायीच मांस खाणे हा मुसलमानांचा धर्मच आहे! या हो, बसा असे.

शंकर : कोणी कोणी जाति, चोरी करणे हा आपला धर्मच मानतात, तेव्हा त्यांना तुम्ही चोर म्हणून झिडकारणार नाही का? चोरी, धर्म म्हणून मानली; म्हणजे चोर, साव होतील का? मेलेल्या गाईच्या मांसाची घाण काल माझ्या अंगाला जितकी येत होती; तितकीच आजही येईल. मग मला जसे, मुसलमान होताच तुमच्या शेजारी बसता येत आहे, तसे त्या महारांना हिंदु राहूनही बसता येईल, असे एखाद प्रायश्चित्त, तुमच्या शास्त्रांत नाही का?

कारभारी : अस्पृश्यांस कसले प्रायश्चित्त असणार नाईक? क्वचित् हया जन्मी सत्कृत्य केल्याने पुढेच्या जन्मी स्पृश्य कुलात उत्पन्न होता येईल तर येईल. या जन्मी तर काही प्रायश्चित्त नाही.

शंकर : परंतु काल माझा काही पुनर्जन्म झाला नाही; मी एका दिवसात कसा स्पृश्य झालो? मी कोणचे प्रायश्चित्त केले?

कारभारी : मुसलमान झालेत ना तुम्ही? हेच प्रायश्चित्त, हिंदु राहून महारांना स्पृष्य होता येत नाही. मुसलमान झाला म्हणजे तो हिंदुच राहत नाही. तो महारच नाही, मुसलमान होताच त्याची शुद्धि झाली.

शंकर : तर मग किसन जर मुसलमान झाला तर तुम्ही मांडीला मांडी लावून बसू द्याल त्याला?

पाटील : मोठ्या आनंदाने. धर्मच आहे- रूढिच आहे ती आम्हा हिंदु लोकांची आणि आम्ही हिंदु लोक हिंदुधर्माचे पालन जीव गेला तरी करण्याला सोडणार नाही. महार, हिंदु आहेत तो त्यांना, प्राण गेला तरी, आम्ही शिवणारे नाही. तो मुसलमान होताच, प्राण गेला तरी शिवण्याला सोडणार नाही. या, या नाईक बसा हो जरा. सोडा तो काथ्याकूट. याहो (हात धरून जातात.)

शंकर : (हात झिडकारून) पाटील, कारभारी, कालपर्यंत जर तुम्ही, या हिंदु महार असताना माझ्या हातात असा हात घातला असता तर, कृतज्ञपणाने माझे हृदय लोण्यासारखे विरघळून गेले असते. तुमच्या औदार्याल मी इतका जिकलो गेलो असतो की, तुमच्या पायांचे रजःकण मी देवाच्या अंगाऱ्यासारखे, मस्तकावर धारण केले असते. पण माझी सावली देखील स्पर्शत नव्हता; आणि हिंदुत्वाचा त्याग

करिताच, तुमच्या देवमूर्ति पूजणे हे पापप्रद आहे; असे मी समजूं लागताच, तुम्ही माझा हात बळाने धरू पाहत आहा; या तुमच्या लघळपणाचा मी धिक्कार करतो. चल, किसन, अजून तरी अस्पृश्यतेचा काळाकुट्ट डाग धुवून काढायला आणि महाराचा 'मनुष्य' व्हायला मजबरोबर चल! एक शब्द उच्चार 'मी हिंदु नाही!' तो एक हिंदु शब्द तेवढा मज्जातून उपटून टाक आणि उद्या याच वेळेला चोवीस तासांचे आत तू, यांच्या मांडीशी मांडी लावून बसशील, यांचा नाईक होशील, हिंदु राहून उभ्या जन्मांत तुला शुद्धि नाही. तो हिंदु शब्द जिभेवरून पुसून टाक की, या घटकेला तू शुद्ध आहेस. असे यांचा हिंदु धर्म सांगतो!

किसन : त्यांचा हिंदुधर्म तसे सांगत असेल. पण माझा हिंदुधर्म सांगत नाही. तसे हिंदु राहून मला एका जन्मानंतर, पुण्य कृत्याने शुद्ध आणि स्पृश्य होता येईल इतकी देखील आशा मला पुरेशी आहे. कारण माझा हिंदुधर्म सांगतो की, हिंदुत्वाचा त्याग करून, मुसलमान वा इतर कोणताही अहिंदुधर्म स्वीकारताच मला जन्मोजन्म शुद्ध होण्याची आशा उरणार नाही. स्वधर्मत्यागाचे पातक धुतल जाणार नाही; शंकर!

शंकर : छेः! त्या नांवाचा, याच जन्मात नरकात नेऊन पाडणारा जड धोंडा, माझ्या गळ्यात पुनः बांधू नको. मी शंकर नाही. शिकंदरखान आहे.

किसन : ठीक आहे तर, शिकंदर! हिंदुधर्माचा त्याग करून मी मुसलमानी धर्म स्वीकारला असता मला केवढी महती प्राप्त होईल; हे माझ्या मनावर ठसविण्यासाठी, तू इतका वेळ पराकाष्ठा केलीस. हिंदु समाजाच्या हातून महारांचा छळ होते आहे, हे तू सिद्ध करू पाहतोस; परंतु महारही हिंदुसमाजाचाच भाग आहे. तेव्हा महार महारांचा छळ करतात, असच तुझ्या विधानाच विलक्षण तात्पर्य निघत. हिंदु समाजातील एक भाग अज्ञानाने आणि भ्रांत गर्वमदाने, त्याच समाजाच्या अस्पृश्य गणल्या गेलेल्या अन्य भागाचा छळ करतात हे खरे आहे. परंतु त्या एका भागाच्या चुकीकरिता, मी हिंदु समाजच सोडण्याचा यत्न करणे म्हणजे मी मलाच सोडून जाण्याची इच्छा करण्यासारखे वेडगळपणाच होईल. तू हिंदुत्वाला मुकल्याले केवढ थोरपण पावला आहेस, त्याचे प्रदर्शन मजसमोर करून हिंदुत्व सोडण्याला माझे मन वळविण्याचा, तू इतका प्रयत्न केलास, असाच प्रयत्न पूर्वी एका शेपूट तुटून गेलेल्या कोल्ह्याने केला होता. त्या लांड्या कोल्ह्याप्रमाणे तुझा हा प्रयत्नही मला हास्यास्पद वाटते आहे. या पाटलाच्या मांडीशी मांडी लावून बसण्याचे एक साधन, ही काही माझ्या हिंदुधर्माची व्याख्या नाही. या कारभाऱ्याच्या हाताला हात लावण्याची योग्यता अंगी यावी म्हणून मी काही हिंदु धर्मात जन्मलो नाही. अनेक जन्म पुण्यसंचय करिता करिता या हिंदुधर्मात, मी एवढ्यासाठी जन्मलो आहे की, भगवंतांनी माझा हात आपल्या हातात धरावा. ही तुझी दस रुपड्यांची शिकंदरखानी काय, पण ऐश्वर्याच्या दिग्गजावर विलासाची रत्नखचित अंबारी चढवून जर मला तीत कोणी बसविले, परंतु त्या अंबारीवर मी चढताच, तिच्यावरील हिंदुधर्माचा

भगवा ध्वज काढून हिरवा चांद किंवा रक्ताळलेला क्रूस तिच्यावर उभारला, तर त्या विलासाच्या अंबारीवर थुंकून आणि त्या ऐश्वर्याच्या हत्तीला लाथाडून, त्या रत्नखचित उंचीवरून मी जी उडी घेईन ती नीट ह्या हिंदूच्या पायाखाली तुडविल्या जाणाऱ्या अस्पृश्यतेच्या धुळीत होय. हिंदुधर्मांची ही नीच धूळही तुझ्या त्या बाटग्या अंबारीच्या श्रीमंतीहून अत्यंत श्रेष्ठ आहे. कारण या धुळीत, या माझ्या हिंदुत्वाचे देवालयाच्या मार्गावरील धुळीत वसिष्ठांचे पदरज मिसळलेले आहेत. तीत श्रीकृष्णाचे पदरज मिसळलेले आहेत, तीत श्रीरामाचे पदरज मिसळलेले आहेत. तीत वाल्मिकींचे पदरज मिसळलेले आहेत! विक्रम आणि शालिवाहन, ज्ञानेश्वर आणि एकनाथ, रोहिदास आणि चोखामेळा, यांनी याच हिंदुत्वाच्या देवालयाच्या मार्गावरील धूळे, अंगारा म्हणून आपल्या मस्तकावर धारण केली आणि ते मुक्त झाले. त्या हिंदु योग्यांच्या धुळीत लोळताना लागणार सुख, तुझ्या कुराणाच्या भोग्यांच्या स्वर्गातील गाद्या गिरद्यांवर लोळणाऱ्या सुखाहून, मला अधिक चिरंतन आनंद देत आहे. या पाटलांच्या मांडीला मांडी लावून बसण्यासाठी तर काय, पण त्या दिल्लीच्या मयूरासनावर बसण्यासाठीही मी हिंदुत्वाचा त्याग करणार नाही. अस्पृश्यतेचा छळ सोशीन, माझ्या हिंदुबंधूंच्या दाराशी पाण्याविना तळमळत पडेन, हिंदूच्या महारवाड्यात त्यांचा पायपोस होऊन राहीन, हिंदूच्या रूढीच्या हत्तीखाली चिरडून जाऊन मरेन, पण हिंदु म्हणून मरेन. जेव्हा केव्हा ते माझे हिंदु बंधू बंधुप्रेमाचा हात पुढे करतील, तेव्हाचा त्या हाताचा आधार घेऊन, या अस्पृश्यतेच्या धुळीतून उठेन. पण परधर्माचा आणि परकीयांचा हात धरणार नाही. मी माझ्या बापाशी कृतघ्न होणार नाही. माझा बाप तुझ्या बापाप्रमाणेच हिंदु आहे. मीही हिंदु महारच राहणार, हिंदु म्हणूनच जगणार, हिंदु म्हणूनच मरणार, हिंदु म्हणूनच हिंदुकुळात परत जन्म घेणार. तुझी ती पाटलाची मांडी आणि तुझी मुर्दाड शिकंदरी, तुझी तुलाच लखलाभ होवो! (जातो.)

शंकर : अरे, याचा नेहमीचा शांत स्वभाव, एकाएकी दारूच्या कोठारासारखा भडकून, ज्वालाग्राही शब्दांचा वर्षाव करीत, माझ्या मनाला कसा भाजून काढता झाला! किसन- किसन थांब. (जातो.)

प्रवेश ७ वा

(स्थळ : गंगाजीचे घर. नारंभट आणि देवीसिंह येतात.)

नारंभट : या गंगाजीने अजून त्या कमलिनीच नख देखील दृष्टीला पडू दिले नाही बुवा! आपल्या मागल्या बाकीचा घोळे घालून बसली आहे. आता त्या म्हाताऱ्या मावशीचे गाठोडे हाती लागण्यावर, सर्व गोष्टी अवलंबून आहेत. पण देवीसिंह, ते गाठोडे मी उपटतो. परंतु तू माझ्या बाकीच काय करणार

आहेस? मी तुला तुझी बाकी फेडायला देऊ शकेन, इतके काही ते गाठोडे मोठे नाही हो! गंगाजीच्या घाटावर आम्ही आजपर्यंत जी मौज मारिली तिच्यासाठी, आमची स्वतःचीच बाकी फेडता फेडता आमच्या नाकी नवे येणार आहेत. तेव्हा तुम्ही या प्रकरणात स्वतंत्र व्यवस्था करावी हे बरे!

देवीसिंह : अगदी सज्ज आहे मी माझी बाकी फेडायला. देवाच्या दयेने एक डबोल माझ्याही हाताशी लागते आले आहे. तो सत्यवान् आहे ना? त्याचा माझ्यावर विलक्षण विश्वास बसला आहे, तिकडे आम्ही संधान लावतो. पण पाटलाला तर अगदी मुठीत आणून ठेवला आहेस ना?

नारंभट : अगदी मी म्हणेन ती पूर्वदिशा. चोख्याच नाव घेतल की, 'पाजी लुच्चा' म्हणून भडकतो. तुझे नाव घेतल की, काय सज्जन आहे, प्रामाणिक आहे.' म्हणून समाधीत डोलू लागतो. आपणा दोघांवर काही प्रसंग गुदरला तर तो आपले रक्षण करण्याचा प्रयत्न अवश्य करील.

देवीसिंह : ठीक, पाटलाच्या घरी ज्यासाठी बस्तान बसविल त्यातील दोन कार्ये- म्हातारीच डबोल आणि पाटलाचा विश्वास, ही तर तू जवळ जवळ हस्तगत केलीसच. पण अजून त्या पाटलीणबाई- त्या त्या मालिनीबाई - त्यांची आमची नुसती भेट देखील घडविली नाहीस की रे चोरा! स्वतःच हात मारलास काय रे!

नारंभट : (स्वगत) अहं! या ऐदोबाला त्या लुटीचा थांगच लागू द्यायचा नाही. (उघड) अरे, कसला हात, एकदा गेलो होतो हात मारायला तर, झक मारल्यासारखा फजीत पावलो. छे बुवा, ती मालिनी मात्र खरोखर पतिव्रता आहे. अरे, पुराणाला आजपर्यंत एकटी पण आली नाही. पाटलांना घेऊन बसते जवळ! तेवढे काम काही साधणार नाही, बुवा. अरे आता गंगाजीच्या माडीवर चढलंच पाहिजे. मघा मी तुला सांगतच होतो की, त्या म्हाताऱ्या मावशीचे सगळे डबोल तिच्या गड्याकडून तिने पुरवले आहे कुठेस. इतके मी त्या गड्याकडून दारूच्या गुंगीत आधीच काढून घेतल आहे, आज त्याला पुनः माडीवर झिंगवला आहे. आज त्याच्या तोंडून, तेवढे ते सोने कुठे पुरले आहे ते ठिकाण काढले पाहिजे. तेवढे साधले तर, गंगाजीची मागची बाकी फेडून टाकतो आणि कमळीचा हात धरतो! गंगाजीने वचन दिले आहे.

देवीसिंह : पण तुझी बाकी फिटून जर काही उरले, तर माझी बाकी फेडायची, अं! त्या सत्यवानाला नागविताच मी तुझे पैसे परत करीन, म्हणजे कमळीचा दुसरा हात मला पण धरता येईल. मला पण गंगाजीने वचन दिले आहे. ते बघ ओरडायला लागले. बहुतेक चढली आहे सगळ्यांना. चल माडीवर.

नारंभट : अरे, पण मी मद्याला स्पर्श करणार नाही अं! ब्राह्मण धर्म आहे.

देवीसिंह : म्हणतो कोण लेकाचा तुला, स्पर्श कर म्हणून! एकदा ब्राह्मण सरसहा मद्य पिऊ लागले तर, क्षत्रियांच्या वाट्याला, थेंब तरी उरू देतील का? (माडीचा देखावा उघडतो. लोक दारू पिऊन झिंगले आहेत.)

देवीसिंह : कोणचा गडी रे?

नारंभट : तो, तो मावशीच्या माहेरचा कुणी नातलग आहे. लहानपणापासून तिच्या घरी, गड्याचे काम पण करीत असतो. झिंगला आहे ना पण पुरा; ओळखायचा मला नाही तर. तू हो पुढे, बघ एकदा सगळे रंगात आले आहेत की नाही ते!

(पहिला दारूडा आपल्या डोक्यावर एक हात उंचीवर काहीसे हातांनी चाचपीत येतो नि मोठ्याने रडतो.)

देवीसिंह : अरे काय झाले रे तुला?

पहिला दारुडा : माझे तोंड हरवले, इथे होते हो कुठेस.

देवीसिंह : (दुसऱ्या दारुड्यास) तू रे काय असे हरवल्यासारखे शोधीत आहेस भुईवर?

दुसरा दारुडा : याच हरवलेले तोंड ज्या अर्थी त्याच्या खांद्यावर नाही, त्या अर्थी ते खाली पडले असले पाहिजे. हाय, हाय, जर तुझे तोंड सापडले नाही तर मित्रा, आता तू दारू कशी पिशील?

(पहिल्या दारुड्याच्या गळ्यात गळा घालतो.)

पहिला दारुडा : शोक करू नकोस. तोंड कंठासुद्धा गळून पडल्यास, खांद्याच्या उरलेल्या उघड्या भोकाने मी दारू पिईन.

तिसरा दारुडा : दारूला खांदा कोण देतो आहे? दारू काय मेली आहे?

चौथा दारुडा : मूर्खांनो, काय बरळता आहात? तुम्ही दारुडे आहात.

पहिला दारुडा : आम्हाला कोण दारुडा म्हणतो? माझे तोंड हरवले म्हणून. नाहीतर तुझी जीभच छाटून टाकली असती.

चौथा दारुडा : सज्जनहो, रागावू नका. मी तुम्हालाच दारुडे म्हणत नसून, तुमच्या आजाला, पणजाला सर्वांनाच दारुडे म्हणतो.

प.दु.ति. दारुडा : मग काही हरकत नाही, आम्ही पूर्वजांची परंपरा सोडली, असे न व्हावे.

देवीसिंह : (त्या गड्यास) ओळखलंस का मला?

गडी : न ओळखायला काय झाले? दारू प्यालो म्हणून मी आठवणे विसरत नाही हो! दुसरे आईबहिणींची ओळख विसरतात, त्यांनी दारू पिऊ नये. पण मी, मी माझ्या आईला कसा विसरू? माझी आई ती! (देवीसिंहाचे गळ्यात मिठी घालतो.)

देवीसिंह : ह भटजी, तुमच काम बरंच सोपे झाले. अगदी शुद्ध सुटली आहे लेकाची. वाचलेत तुम्ही.

गडी : लेक होय? खरच बरे! आई तुझ्या पोटचा मी लेक आहे. वाचलीस अं, तू? माझ्या लहानपणीच तू मेलीस? म्हणून लोक सांगत, पण आता तूच सांगतेस, वाचलीस म्हणून. तेव्हा तू जिवंत आहेस यात शंकाच नाही. मी तुला कसा विसरू? दारू प्यालो म्हणून काय झाले?

नारंभट : दारूला काही हरकत नाही, केवळ एका गोष्टीला जपले पाहिजे. एक की, गुप्त गोष्ट दारू प्यायल्यानंतर त्या निशेत, कुठेही बोलली न पाहिजे. तो दोष तुझ्यात नसला, तर तू दारू प्यालास हा काही दोष नाही.

दारुडा गडी : अहो दारू प्याल्यानंतर मी कोणतीही गुप्त गोष्ट कोणाला सांगितली नाही. पिण्याच्या आधी काय ज्या गुप्त गोष्टी लोकांना कळविल्या असतील त्या असतील.

देवीसिंह : परंतु तू गुप्त गोष्टी दारूतही सांगत नाहीस; हे एखाद्या गुप्त गोष्टीच उदाहरण सांगून सिद्ध करू शकशील?

दारुडा गडी : अगदी संपूर्णपणे, माझी आई ती! ऐक उदाहरण. मी ज्या घरात राहतो, त्याच बागेत आमच्या धनिणीच एक डबोल पुरलेले आहे; पण मी आजपर्यंत दारूच्या नशेत, एक अक्षर तरी कधी कुणाशी बोललो आहे का?

नारंभट : हे खरे असेल तर मात्र तुला, दारूचे व्यसन नाही खरे. अगदी कोणापाशी बोलला नाहीस ना त्या बागेची गोष्ट? त्या चिंचेच्या झाडाखाली आहे मला माहीत आहे.

दारुडा गडी : चूक आहे तुमची. उचलली जीभ आणि लावली टाळ्याला. चिंच आंबट असते. तिच्याजवळ कोणी सोने ठेवले तर, ते आंबट होण्याचा संभव असतो. आंबा गोड असतो, ठेव गोड असते, सोने गोड असते, कारण त्या सोन्याने वाटेल तितकी गोड मिठाई विकत घेता येते. म्हणून ते सोन्याचे डबोले आमच्या धनिणीने आंब्याच्या झाडाखाली पुरले. पण या गुप्त गोष्टीचा आजपर्यंत दारूमध्ये मी ब्र तरी काढला आहे का कधी? आई, तुला देखील माहीत नाही, मग ह्या बापाला कुठली माहिती?

देवीसिंह : नाही खरीच! खरा निर्व्यसनी दारुडा असावा, तर असा असावा. पी, आणखी एक पेला. गुप्त गोष्ट बोलू नकोस; मग दारू प्यायला काही हरकत नाही. (त्याला पेला देतो.) काय भटजीबुवा, आता आम्ही पण एखादा झोकू का?

नारंभट : झोक, पण झोक माझ्यावर पडू देऊ नकोस हो झोकल्यानंतर! आणि मला आग्रह करायचा नाही. मी दारू पिणार नाही.

पहिला दारुडा : कोण नाही दारू पिणार? तू पिशील, तुम्ही प्याल, तो पिईल, ते पितील, मी पिईन, आम्ही पिऊ (नारंभटाला धरायला धावतात.)

नारंभट : अरे, नका असे महत्पाप करू मी ब्राह्मण आहे.

दुसरा, तिसरा दारुड्या : आणि आम्ही कोण आहो? नाऱ्या, ओळखले तुला. गाढवा, शुक्राचार्यासारखा देखील ब्राह्मण, दारू पीत होता.

नारंभट : पीतंभटजी, पण त्या शुक्राचार्यांनीच पुढे वृद्धपणी असा निर्बंध घातला की, ब्राह्मणांनी दारू पिऊ नये.

दुसरा, तिसरा दारुडा : मग आम्हीही वृद्धपणी तसा निर्बंध घालणार आहोतच. तूही आता दारू पी, आणि वृद्धपणी दारू पिऊ नये असा निर्बंध घाल. पण नारंभट, आज मद्याला नाही म्हणू नकोस.

प. दारुडा : अरेरे, कोण ही आपल्या ब्राह्मण जातीची अवनति! अहो यज्ञामध्ये सोमपान करून तर्र झालेल्या ब्राह्मणांचेच आम्ही वंशज ना? कोण ब्राह्मणांची अवनति, मद्य प्यायला भितात. कोण ही अवनति? (रडू लागतो.)

नारंभट : रडू नका दीक्षित. यज्ञामध्ये दारू वा मद्य वा सोम पिण्याला, माझी मुळीच हरकत नाही.

सगळे : चला तर आपण प्रथम यज्ञ करू या.

देवीसिंह : परंतु कुंड कुठून आणायचे?

प. दारुडा : हे माझ्या खिशातून. (चिलीम काढतो.)

दु. दारुडा : थांबा. हे कुंड शास्त्रीय दृष्टीने प्रमाणबद्ध आहे की नाही, ते ठरविल पाहिजे.

ति. दारुडा : शास्त्रशुद्ध आहे हे कुंड. युगाप्रमाणे स्मृति बदलतात, स्मृतीप्रमाणे यज्ञ बदलतात, यज्ञानुरूप कुंडं बदलतात. सत्ययुगात, यज्ञकुंड; त्रेतामध्ये, होमकुंड; द्वापारात, वैश्वदेवाच कुंड; आणि कलियुगात हे मृत्तिका कुंड युक्त आहे. ह्याला चैलिम कुंड म्हणतात.

प. दारुडा : बरे तर, आता औपनिषदीय भाषेत, मी उद्गाता होऊन मंत्र म्हणतो- चिलीम हेच कुंड, चमक हीच अरणी, ठिणगी हाच आहवनीयाग्नि, तंबाखू हेच हवनीय द्रव्य, मुख हीच धमनी, भिंत हाच यूप; आणि तिला टेकून यज्ञात बळी देण्यासाठी उभा केलेला हा मी मनुष्य, हाच पशु. बस्स- सिद्ध झाला आहे अग्नि.

नारंभट : (चिलमीचा झुरका मारून म्हणतात.) अगदी प्रज्वलित झाला आहे हुताशन.

प. दारुडा : ह तर मग हताश न होता, उभे रहा सगळे. आपण सर्व हेच ऋषि, दारू हाच सोम, बाटली हाच चषक आणि पिणे हेच पान होय! आता कोणच्याही ब्राह्मणाला या यज्ञामध्ये दारू प्यायला हरकत नाही! प्या! प्या! (सर्वजण पितात.)

देवीसिंह : ब्राह्मणाला हरकत नाही आणि क्षत्रियांना हरकत आहे की काय, या यज्ञात दारू प्यायला?

प.दारुडा : अर्थात्, क्षत्रियांना वेदोक्त कर्माचा अधिकार नाही.

देवीसिंह : थोबाड रंगवून देईन!

नारंभट : तुम्ही आत्ता जे थोबाडीय शास्त्रवचन उद्धृत केलेत त्या शास्त्राधाराप्रमाणे क्षत्रियांना वेदोक्त कर्माचा अधिकार आहे असे माझे स्पष्ट मत आहे. खरे पाहिले तर, अस्पृश्यांना सोडून बाकी सर्वांना, विशेषतः द्विजांना दारू पिण्याचा अधिकार आहे कारण द्विजांना वेदोक्त कर्म निषिद्ध नाही.

सगळे : अगदी बरोबर आहे. अस्पृश्यांना दारू पिण्याचा मुळीच अधिकार नाही. कारण ते अस्पृश्य असल्याने ती विटाळेल आणि मग द्विजांना ती पिता येणार नाही. (इतक्यात गंगाजी येते.)

गंगाजी : काय मेले तर्र झाले आहेत पहा! देवीसिंह, नारंभट, शेटजी, भिक्या, काय रे मेल्यांनो! (ती हाका मारते - तसतसे ते तिच्यापुढे हात जोडून उभे राहतात.) तुम्ही इथे गुत्त्याचे स्वरूप आणले आहात काय?

प. दारुडा : अहाहाहा! ही मूर्तिमंत भगवती शक्तिच प्रकट झाली आहे, आम्हा शास्त्र्यांच्या भक्तीला भुलून! हे देवि, तुला नमस्कार असो, क्षमा कर. (गुडघे टेकतो.)

दुसरा दारुडा : देवी नव्हे, ही मूर्तिमंत दारूचे प्रकट झाली आहे आम्हा शास्त्र्यांच्या भक्तीला भुलून! हे दारू तुला नमस्कार असो, क्षमा कर. (गुडघे टेकतो.)

ति. दारुडा : छे छे, दारू नव्हे, ही मूर्तिमंत दारूची बाटलीच प्रकट झाली आहे, सर्वांच्या भक्तीला भुलून. कारण ही दारू असती तर, आपल्या तोंडात सापडली असती. परंतु ज्याप्रमाणे बाटलीच्या आत मधुर द्राक्षासव भरलेले असते, त्याचप्रमाणे हिच्या आत मधुर, आणि मोहक, असे कामासव भरलेले आहे. बाटलीच्या काठाला तोंड लावताच जसे उन्मत्त आनंदाचे घोट भराभर मुखात जातात, त्याचप्रमाणे हे बाटली, तुझ्या ओठांना मी मुख लावताच-

गंगाजी : (ताडकन् त्याच्या तोंडात मारून) तुझ्या श्रीमुखात अशी भडकावली जाते!

नारंभट : उकळत्या दारूच्या बाटलीच बुच्च असे फाडकन कुठे उडाले?

गंगाजी : (त्याच्या तोंडात मारून.) हे इथे, कळले? मेल्यांनो, निघता का नाही इथून? का त्या दरवानाला बोलावून, तुडवू एकेकाला लाथांखाली? निघा, निघा! (सर्व पडत आणि एकमेकावर धडपडत जातात.)

प्रवेश ८ वा

(चोखा मेळा भजन करीत धरणे धरून बसला आहे.)

चोखा : देवा, अजून तुम्हाला दया येत नाही ना? बोला, माझ्या प्रश्नांची उत्तरे, बोला? जर अस्पृश्यांना तुझे रूप न्याहाळता येणे, तुझ्या प्रसादाची रुचि चाखता येणे, तुझ्या स्पर्शाच्या सुखाने पुलकित होणे, तुझ्या नामस्मरणाच्या संगीताने तल्लीन होणे निषिद्ध आहे, तर मग तू, तुझ्या रूपाची सुंदरता आमच्या डोळ्यांत, तुझ्या प्रसादाची रुचि आमच्या जिव्हेत, तुझ्या स्पर्शाची लालसा आमच्या हृदयात आणि तुझ्या भक्तीची तहान आत्म्यात का उत्पन्न केलीस? तहान आणि पाणी, भूक नि अन्न, इच्छा आणि पूर्ति, ही दोन्हीही उत्पन्न करण्याचे सामर्थ्य असणाऱ्या अनंता, अस्पृश्यांस तुझ्या भक्तीची तहान देऊन तुझ्या पायाचे तीर्थ मात्र त्यांना का निषिद्ध केलेत? तहानेने त्यांचा आत्मा तळमळत आहे.

अभंग

काही तरी अभय का न द्या उत्तर का ऐसे निष्ठुर झाला तुम्ही ।।

मी तो कळवळोनी मारीतसे हाक तुम्हा पडें धाक कासयाचा ।।

त्या शास्त्रांचा, देवा, तुला देखील धाक वाटतो का?

तू ह्या शास्त्रांना केलेस की ह्या शास्त्रांनीच तुला केले? बोला!

याती हीन आम्हा कोण अधिकार, याचे त्वाउत्तर द्यावे स्वामी ।।

चोखा म्हणे हीन याति नरदेह, पडला संदेह काय करू ।।

नेत्रीं अश्रुधारा आहे तुझ्या द्वारी, लक्ष चरणावरी ठेवोनिया ।।

का गा मोकलिले न चि येसी का गा, काय मी केशवा चुकलोंसे ।।

नेणे करू भक्ति नेणे करू सेवा, न येसी तू देवा कळले मज ।।

चोखा म्हणे माझ्या जिविचा विसावा, पुकारितो धावा म्हणोनिया ।।

(स्तब्ध होऊन ध्यानस्थ बसतो.)

सोयरा : (प्रवेश करून) अगबाई, भजन करता करता या माझ्या कांतांना ग्लानि आली. दिवसामागे दिवस लोटत आहेत. पण अन्नाचा लेश पोटात घेत नाहीत. त्या योगाने शरीर जरी अगदी कृश झाले आहे तरी तेज पहा ते मुद्रेवर कसे दिवसेंदिवस प्रकाशत चालल आहे. अशक्ततेने ती ग्लानि येते, का हे असे मधून मधून ध्यानस्थ होतात! नाथ! नाथ? क्षमा करावी, पण म्हटले एक मागणे आहे.

चोखा : कोण? भार्ये, विचार काय ते?

सोयरा : नाथा, आजपर्यंत आपल्या भगवद्भक्तीच्या आड मी आले का? संसाराच्या लोभस्तंभाला बांधून टाकण्यासाठी, माझ्या या मायापाशांचा कधी तरी दुरुपयोग केला आहे का?

चोखा : साध्वि, तसे तू कधीही केलेले नाहीस. फार काय सांगू, अग्नीला जशी दीप्ति, विवेकाला जशी मति, किंवा मोक्षाला जशी भक्ति, तशीच माझ्या परमार्थसाधनाला तू मूर्तिमंत अनुकूलताच झालेली आहेस.

सोयरा : तर मग मी म्हणते त्याचा आपण विपरीत अर्थ घेऊ नये. अन्नावाचून आपण इतके कृश झाला आहा की, मला आपल्या प्राणांची चिंता वाटू लागली आहे. आपण किंचित् ध्यानस्थ बसताच आपणाला ग्लानि आली, असे वाटून मी घाबरून जाते. म्हणून म्हणते आपण थोडेसे अन्न स्वीकारावे. परंतु माझ्या या दैहिक ममतेसाठीच मी आपणाला अन्नग्रहणाचा आग्रह करते असे नाही; तर त्याला आणखी एक बलवत्तर कारण आहे. महाराज! भगवान् प्रत्यक्ष येऊन प्रसाद देतील, तरच मी अन्न घेईन, हा जो आपण पण केलात, हा एक प्रकारचा त्रागा होते नाही का? भगवद्गीतेतच सांगितले आहे की, शरीराला अत्यंत कष्ट देणारी तपस्या जे करितात, ते मला, आत्म्याला, शरीरस्थ देवालाच त्रास देतात. तेव्हा या तपस्येने आपणांला क्वचित् पुण्य एकीकडे राहून पापच लागते नाही का?

चोखा : तोच तर मुख्य प्रश्न आहे. पुण्य काय किंवा पाप काय, शास्त्र, शिष्ट आणि संत या तिघांचा मेळे नाही; बुद्धि आज जे पुण्य म्हणून आचरू जाते, तेच उद्या आचरण पाप समजू लागते; म्हणून आता पापपुण्याचा निर्माता जो परमेश्वर त्याचेच तोंडून याचा निर्णय ऐकण्याचा निश्चय केलेला आहे आणि आत्म्याचे कष्टाविषयी विचारशील तर मी भाजी भाकरी पोटभर खाऊन जे सुख होते, ते या जन्मात बरेच वेळा अनुभवले आहे. परंतु परमेश्वराचे प्राप्तीसाठी अन्नत्याग केल्यापासून, जे सुख आणि जी शांति, माझा आत्मा भोगू लागला आहे, तितकी तो कधीही उपभोगीत नव्हता. अस्पृश्यांना देवमूर्ति-दर्शनाचा अधिकार आहे की नाही, अस्पृश्यांना देवळात जाणे वैध की अवैध, त्यांना ह्या जन्मीच उद्धार आहे की नाही, थोडक्यात म्हणजे अस्पृश्य हे मनुष्य आहेत की नाहीत, का त्यांनी कितीही पुण्य

आचरिल, कितीही शुद्ध आणि पवित्र परोपकारी जीवन घालविल; तरी केवळ ते अमक्या जातीत जन्मले म्हणून त्यांस ह्या जन्मी उद्धार नाही, हया प्रश्नाच उत्तर मिळेतो, साध्वि, आम्ही आम्हास पुण्यप्रद कर्म कोणचे, ते ठरवावे तरी कसे? म्हणून प्रथम ते ठरवून घेईन.

पापपुण्याच्या निर्णयाच ओझ आता, माझ्या दुर्बळ खांद्यावरून, पांडुरंगाच्या चरणापुढे मी टाकून दिले. माझी बिगार, माझी वेठ संपली. आता मी निर्भय, निश्चिंतपण विश्रांति घेत आहे. पांडुरंग आता स्पष्टपण जेव्हा सांगतील, हे आचरण तुला अस्पृश्याला पुण्यप्रद आहे, तेव्हाच पुनः कर्मास स्पर्श करणे! नाही तर ते पूर्वीच कर्म आणि हा कर्मसंन्यास, दोन्ही पांडुरंगाच्या चरणी वाहून प्राण विसर्जन करणे - तिसरी गोष्ट नाही.

सोयरा : नाथ, पण देवाला हे एक संकटच घालणे आहे, नाही का? असे धरणे धरल्याले, देव प्रत्यक्ष येऊन प्रत्येकाला भेटतातच; असेही नाही. फारच थोड्या महात्म्यांचे धाव्याला देव पावले. परंतु शेकडो लोक देवाचे दारी अन्न सोडून, धरणे धरून बसले, परंतु त्यांच्या त्या त्राग्याचा देवाला कंटाळा येऊन ते मरणी मरून गेले पण देव आले नाहीत, हेही ध्यानात धरावे.

चोखा : परंतु, साध्वि, देवाने यावेच म्हणून आम्ही हट्ट धरून तपस्या चालविली असती तरी तो क्वचित् त्रागा होता. देवाने येणे न येणे, माझ्या प्रश्नाला उत्तर देणे न देणे, हे देखील आम्ही देवाच्या इच्छेवरच सोपवितो. आम्ही अन्न सोडले नाही; तर कांते, आमचे अन्न सुटले आहे. माझ्या प्रियकराच्या दर्शनावाचून मला झुरणी लागली आहे. वसंताचा स्पर्श वेळेवर झाला नाही म्हणून लता जी सुकते; ती त्याला संकटात घालावे म्हणून थोडीच सुकते; वासंतिक वायूच्या श्वासोच्छवासावाचून तिला फोफावताच येत नाही, म्हणून ती सुकते; आईवाचून तान्हे रडते ते तिला संकटात घालायला नव्हे; तर तिच्यावाचून त्या तान्हयाला हासवतच नाही, म्हणून ते रडते. तशीच आमची अवस्था. त्या जगज्जीवनावाचून माझ्या जीवनाला जगवतच नाही; म्हणून ते झुरते आहे. देवाने मला भेटावे म्हणून नव्हे; तो विचार त्याचा आहे. पण त्याच्या भेटीवाचून आम्हाला वाचवतच नाही; म्हणून आम्ही मरणाचे दारी बसलो आहो. एका श्रीहरीवाचून आता काही नकोस झाले आहे; त्यांनी भेटावे ही इच्छा आहे, विनंती आहे. यालाच आम्ही धरणे म्हणतो, पण हा त्रागा नाही. हे त्याला संकट घालणे नव्हे. मी तरी काय करू?

बावरले मन करी धावाधावी, यातुनी सोडवी देवराया ।।

लागलासे चाळा काय करू आता, नावरे वारिता अनावर ।।

तू वो माझा बाप तू वो माझी माय, दाखविणे पाय झडकरी ।।

www.savarkarsmarak.com

मी तव धरणे धरूनी बैसलो, आता काय बोलो ये यापरी ।।

कळेल तैसेंचि करा जी दातारा, तारा अथवा मारा पांडुरंगा ।।

चोखा म्हणे माझा हाचि नेम आता, तुम्ही कृपावंता सिद्धि न्यावा ।।

धीर माझे मना, नाही नाही नारायणा ।।

दया करी पंढरिराया, चोखा लागतसे पाया ।।

(गोविंद गोविंद म्हणत निश्चेष्ट होतो.)

सोयरा : अगबाई हे काय? नाथ! नाथ! मूर्च्छा आली यांना. आता कोणाला बोलवू? एका देवाविणे आता कोणाला बोलावू? देवा, या माझ्या निष्पाप नाथांना अजून का बरे छळता आहा? अहो, उभ्या जन्मात कोणाचे अहित म्हणून चिंतिले नाही; तो माझा हा निरुपद्रवी, परोपकारी, साधूवृत्ति कांत येथे उपास तापास काढीत मूर्च्छित पडला आहे! तुमच्यासाठी पडला आहे ना? हाय! हाय!

आमुची तो दशा विपरीत झाली; कोण आम्हा घाली पोटामध्ये ।।

सोयरा म्हणे माझे जीवप्राण तुम्ही; आणिक तो आम्ही कोठे जावे ।।

नाथ! नाथ! अगबाई, ही मूर्च्छा काही मनस्वी दिसते!

(आकाशवाणी होते. 'सोयराबाई, साध्वि तुझा कांत मूर्च्छित झालेला नाही, समाधिस्थ झालेला आहे.')

सोयरा : कोण आश्चर्य! वरतून कोण बोलल? माझ्या कांतांना समाधि लागली आहे? कोण या भक्तीची थोरवी! परंतु हे काय? एकाएकी माझ्या डोळ्यांना दिपवून टाकणारी, ही तेजस्वी लहर कुठून चमकून गेली? आकाश निरभ्र आहे; वीज तळपली असेही म्हणता येत नाही! अगबाई हे मंजुळ वायु कुठून सुटले? आणि आंबराई फुलून गेली असता जसा दरवळे तीत मावत नाही; तसा हा सर्व प्रदेश सुगंधाने दरवळून गेला, का माझ्या हृदयाला कोणचंस दिव्य सान्निध्य भासमान होते आहे?

चोखा : (एकदम दचकून उठून) साध्वि सोयरे, कांते! आत्ता इथे कोण आले होते? सूर्यासारखा तेजःपुंज असूनही, चंद्रासारखी शीतळ अशी प्रभावळ धारण केलेली कोणाची तरी दिव्य मूर्ति आत्ता इथे उभी होती; सांग, कुठे गेली ती?

सोयरा : नाथ! नाथ, कोणी आले नाही.

चोखा : साध्वि, ती मोहक मूर्ति, ती वरद मूर्ति! (पुनः निश्चेष्ट होतो.)

सोयरा : अगबाई! देखता देखता पुनः समाधिस्थ झाले की? पण ही समाधि की पोटात अन्न नसल्यामुळे आलेली मूर्च्छा! माझा जीव घाबरला आहे. वायूचा झटका तर नाही ना आला यांना!

चोखा : (अकस्मात् उठून) श्रीकृष्णा, नंदकिशोरा, गोपाला, हे गोपीजन वल्लभा, थांब! थांब!

सोयरा : नाथ, हे काय? कुठे आहे श्रीकृष्ण? तो गोकुळामधला गोपगोपींचा वल्लभ, तो आम्हा अस्पृश्यांचा थोडाच पालक वा वल्लभ आहे! तो गोपींसाठी धावेल, अस्पृश्यांसाठी कोण धावणारे?

चोखा : साध्वि, पीतांबरधारी ती गोजिरी मूर्ति कुठे गेली ? आत्ता इथे होती.

सोयरा : महाराज, एकसारखा ध्यास लागल्याले आणि अन्नत्यागामुळे मज्जातंतु अशक्त झाल्याने आपल्याला नसते भास होते असतील! वायूतही भलतेसलते भास होतात.

चोखा : असेल! भासही असेल! आणि वायूविषयी विचारशील, तर हा प्राणदेखील वायुच आहे. ते विठ्ठलाच दगडासारखे अचल देऊळे, हा देखील वास्तविक मज्जातंतूंचा भासच आहे. हे आकाश, हा मी, ही तू. हाही भासच आहे; कारण जे जे नाशवंत, तो तो भास. परंतु त्या त्या नाशिवंतात सापेक्षतः, हे आकाश, हे जग, ही तू, जितकी मला वास्तविक म्हणून भासतात- तितकीच ती मूर्तिही वास्तविक होती! ती- पहा- पीतांबरधारी श्रीकृष्ण मूर्ति! साध्वि, ती पहा! तीच ती मूर्ति! हाच माझा श्रीकृष्ण! हाच माझा देव!

(श्रीकृष्ण प्रकट होतात.)

सोयरा : कोण आश्चर्य! (चोखा आणि सोयरा दोघंही साष्टांग दंडवत घालून)

आनंद जाहला आनंद जाहला, देवोचि देखला देहामाजी ।

डोळीयाचा डोळा दृष्टीस भासला, देव प्रकाशला आदी अंती ।।

वाटले नवले नवले वाटले, देव कोंदाटले मागे पुढे ।

चोखा म्हणे माझा संदेह फिटला, देव प्रगटला देहामाजी ।।

भगवान् आपल्या तेजाला पाहून आम्हा पामरांचे डोळे दिपत आहेत!

श्रीकृष्ण :

हे संता! हे साध्वि! भय नको, उठा!

वरदहस्त माझा, मी श्रीहरि स्वये

हरिभक्ता तुझिया हया मस्तकावरी

ठेवितसे प्रेमभरे,

चोखा :

परि कृपानिधे

आम्ही अस्पृश्य असो, पतित हीन, या

भगवन् तव चरणाची धूळे झाडण्या-

-सही अपात्र, जातीचा मी महार की

श्रीकृष्ण :

आणि म्हणूनीचि अशी करुनिया त्वरा

आलो आहोत येथ सत्वर न असे

येतो धावूनि जरी ब्राहमणहि तुम्ही

असता वेदज्ञ कुणी; आणि वरद हा

हस्त तुम्हा स्पर्श करी की तुम्ही असा

अस्पृश्यचि म्हणुनिया. स्पृश्य जरि कुणी

असता तरि चरण हे न आमुचे तुम्हा

स्पर्शाया सहज असे गवसते कधी!

कोणतेहि नाम दुजे प्रिय न मज गमे

अधिक या युगात पतितपावनाहुनी

www.savarkarsmarak.com

पतितपावनत्व हेचि ब्रीद हया युगी

मुख्यत्वें अंगीकृत गमतसे मनी.

(श्रीकृष्ण वरदहस्त ठेवतात.)

चोखा :

केला अंगिकार माझा उतरला भार

अजामिळे पापराशी, जैसा नेला वैकुंठासी

गणिका नामेचि तारिली, चोखा म्हणे मात केली ।।

श्रीकृष्ण :

ते असो; परंतु मला भूक लागली

तुजसमचि आत्यंतिक गेहि चल कसा

प्रियभक्ता आणि साध्वी प्रथम खावया

द्या मजसी शाक पाक कंद मूल वा

जे असेल जेवू ते पंक्तिसी तुझ्या

चोखा : हे भगवन् भवनाशक भक्तवत्सला

ओघ महान् हया अपुल्या दिव्य दयेचा

वळता ना सहसाचि हया जनावरी

आनंदे अत्युत्कट होते घाबरे

मन माझे पतिताचे, देव घरी ज्या

जायाची बंदि असे सर्वथा सदा

आज महारांच्या त्या तो स्वयेचि की

देव घरी येत असे! भक्तवत्सला

देवा तू थोर नभाहुनी आणखी

घर माझे पतिताचे झोपडीवजा

मावशील तरि देवा त्यात तू कसा?

श्रीकृष्ण :

गेहांतुनि गवळ्यांच्या मावलो जसा

चोखा : जशी भगवंतांची आज्ञा! चल, चल, कोण भाग्य हे आपले!

अभंग

विठोबा पाहुणा आमच्या ये घरा । लिंबलोण करा जीवे भावे ।।

पंचप्राण ज्योति पाजळू आरती । ओवाळू ये पती रखुमाईचा ।।

षड्रस पक्वान्ने विस्तारी गे ताट । जेवू एकवट चोखा म्हणे ।।

चोखा आणि सोयरा : चलावे भगवन् आत.

(ते पाया पडतात आणि श्रीकृष्ण त्यांवर वरदहस्त ठेवून उभे राहतात.)

पडदा पडतो.

www.savarkarsmarak.com

अंक ४ था

प्रवेश १ ला

(स्थळ - सत्यागार. पात्रे - सत्यवान् शिष्यांसह)

सत्यवान् : शिष्यहो, कलियुगाचा अंत होऊन सत्ययुगाचा उदय होण्याचे आधी सृष्टिप्रलय घडतो. त्या प्रलयात सत्ययुगाचे बीज, एका वटवृक्षाच्या पानावर अधिष्ठित असते. हे आमचे सत्यागार म्हणजे, ज्या नवीन सत्ययुगाची आम्ही स्थापना करणार त्याचे, बीज धारण करणार ते वटवृक्षाचे पान होय. सत्य बोला; सत्याने तुमच सर्व इच्छित पूर्ण होईल. कलियुगाचा नाश होईल. देव देखील असत्य बोलत म्हणून पूर्वीच सत्ययुग नाश पावले. आता माणसेच काय पण पशूंसही आम्ही सत्यचरित्र करणार. आमच्या आश्रमात जे पाळीव कुत्रे आहेत; त्यांनादेखील सहज बागडताना लपून उड्या मारावेयाची जी फसवी संवय असते; ती काढून टाकण्याचा आम्ही प्रत्यही उपदेश देत असतो आणि वळण लावीत असतो.

पहिला शिष्य : माझा घोडा हरवला आहे; काही केल्याने तो सापडत नाही.

सत्यवान् : तू कधी आपल्या मुलांशी घोडा, घोडा खेळत होतास का?

पहिला शिष्य : होय.

सत्यवान् : म्हणूनच तुझा घोडा चोरीस गेला. अहो, मुलांना जेव्हा बाप म्हणतो, ‘बाळे, मी घोडा होतो, तू माझ्यावर बैस.’ तेव्हा त्या मुलाच्या कोवळ्या मनावर, असत्य बोलणे हे क्षम्य आहे असा भयंकर संस्कार होते नाही का? ‘सत्य वद, धर्म चर’ म्हणून ब्रह्मचाऱ्याला उपदेश देण्याचा जो प्रसंग, त्या उपनयनातच आपण मुलाला शेजारच्या आळीत भिक्षावळीनिमित्त धाडून म्हणतो, तू काशीयात्रेला गेला होतास! छे! छे! जिकडे पहावे तिकडे खोटे! अरे शिष्या, तू चार दिवस निर्भेळे सत्य बोल, घोडा सांपडेल. आपण होऊन तुझ्याकडे येईल.

पांडुरंग : आचार्य, आपल्या पवित्र आश्रमाचे मलाही सभासद होता येईल का?

सत्यवान् : तुझे नाव काय?

पांडुरंग : पांडुरंग.

सत्यवान् : अरे, धादान्त तू कोळशाप्रमाणे काळ्या रंगाचा असताना तुझे नाव पांडुरंग ठेवले तरी कोण्या लुच्च्याने? असत्य! तुझे नाव कृष्ण- ठेवीत असशील तर बैस. नाहीतर चालता हो. मुलांना पाळण्यात

घातले की, त्याला असत्याचे धडे शिकवायला आरंभ केलाच; हया थापेबाज जगाल! पाळण्याचे गाणे पहा "चहुं बाजूंनी चिमण्या मोर बसवीले" खरे चिमण्या, मोर तर राहोतच; खोटे लाकडी मोरसुद्धा, एका बाजूस देखील बसविलेले नसतात! असत्य भाषणाचा हा पहिला धडा संपताच मुलाचे नाव ठेवण्याचा दुसरा धडा देण्यात येतो. मूल मनुष्य. नाव दगडू, धोंडू किंवा धोंडी! कुणाच नाव 'महावीर', उंदीर पाहून पळे काढतात. नाव 'गोदावरी' आणि वहात नाही मुळीच. नाव 'काशी' आणि म्हणे राहाते नाशिकला. नाव सोनुबाई आणि हाती कथलाचा वाळा! हया थापेबाज जगाचे शिक्षण मुलांना पदोपदी मिळून, त्यांची सत्यबुद्धि ठार मारली जाऊ नये म्हणून आम्ही आमच्या शिष्यशिष्यिणींची नाव पार बदलली आहेत. यापुढे तुम्ही स्वतःच्या मुलींची नाव, एकदा त्यांच्या गुणांरूपांवरून किंवा त्यांच्या आईबापांवरून ठेवावी. गुणावरून नाव कशी ठेवावी, याच उदाहरण पहायचे असेल तर आमच्या ठेंगूबाईंना पहा. त्या ठेंगू आहेत म्हणून, त्यांचे 'यमुना' नाव बदलून, आम्ही 'ठेंगूबाई' नाव ठेवले आहे. त्यांनी त्यांच्या मुलाचे नाव 'ठैंग्य' म्हणून ठेवले. आमची दुसरी सत्यवक्ती शिष्यीण नकटाबाई, यांनी आपल्या पुत्राच नाव 'नाकट्य' ठेवले आहे. उंचाबाईच्या मुलाचे नाव 'औंच्य' नि लंगडाबाईंनी आपल्या पुत्राच नाव 'लांगड्य' ठेवले आहे. अशा नांवात किती सत्य आणि सरळपणा भरला आहे पहा! नाव घेताच अर्धी ओळख पटते. उंचाबाई म्हटले, की उंच मूर्ति डोळ्यासमोर उभी राहते. गुणांवरून नाव ठेवण्याची पद्धत आमच्या पूर्वजांत होती. आईबापांवरूनही मुलांची नाव ठेवीत. पण त्यांत सुधारणा एवढीच केली पाहिजे की, 'राघव' 'पांडव' अशी पितृसाधित नाव सोडून आईवरून नाव ठेवावी. कारण अमक्या बाईंनी अमक्या मुलाला जन्म दिला, हे अधिक विश्वसनीयपणे लोकांना सांगता येते. राधेय किंवा सत्यकाम जाबाली ही सत्य नावे होते. हे पहा! हे येताहेत हया हाडकुळ्यांच उदाहरण. (देवीसिंह येतो नि नमस्कार करून उभा राहतो.) माझ्या सर्व शिष्यांनो, हे शिष्य नवीन असूनही पूर्ण सत्यव्रती आहेत. जीव गेला तरी सत्य बोलेन; अशी त्यांनी शपथ घेतली. नंतर मी त्यांना नाव विचारले. त्यांनी त्यांचे नाव 'माधव' असे सांगताच, मी म्हटले हे असत्य नाव सोडून द्या. त्यांनी त्वरित ते सोडून दिले. मी म्हटले 'तुमची आई स्वरूपाने कशी आहे? ते त्वरीत म्हणाले 'हडकुळी'! मी म्हणालो, तर हडकुळ्या मातोश्रीचे पुत्र म्हणून तुमच सत्यवादी नाव 'हाडकुळ्या' ठेवले आहे. त्या दिवसापासून कागदोपत्री देखील, हे आपले हाडकुळ्या नांवच वापरतात, म्हणून काय हडकुळ्या? बरे आहे ना? बस.

मोहिनी : मला एक विनंती करायची आहे, जरा एकान्तात काम आहे.

सत्यवान् : छेः! छेः! छेः! स्वतः पत्नीशी देखील एकान्तांत काही काम करणे सत्यवादी पंथात निषिद्ध आहे. मग परक्या अनोळखी स्त्रीची गोष्ट कशाला? म्हणून उघड बोल, नाव काय?

मोहिनी : मी फडक्यांची मोहिनी.

सत्यवान् : वाः, वाः! स्त्रिये, फडक्यांची बाहुली करता येईल; पण फडक्याची तुझ्यासारखी चालती बोलती जिवंत स्त्री करता येईल का? आम्हाला धडधडीत फसवतेस? असत्य! त्याज्य! आणि स्वतःचे नाव तुझ्यासारखी कुरूप स्त्री 'मोहिनी' म्हणून सांगण्याचे धाष्टर्य तरी कसे करिते? तुला नाही वाटते तू कुरूप आहेस म्हणून?

मोहिनी : खरच सांगू का? इश्श बाई, मला लाज वाटते.

सत्यवान् : लाज? लाज म्हणजे असत्याचरणाची इच्छा! असत्य त्याज्य सत्यगारांत प्रत्येकाने निलर्ज्ज असले पाहिजे. शरीरावर लाजेल कपडे धारण करणे हेही असत्य- त्याज्यच आहे. बोल, खरे तेच बोल! तुला तू कुरूप आहेस असे नाही वाटते?

मोहिनी : आरशात एकटी बघते, तेव्हा किनई मी मला अगदी रतीसारखी मोहक आहे, मोहिनी आहे; अस्संच वाटते. केवळ दुसऱ्या कोणा स्त्रीसह आरसा पाहिला, म्हणजे जरासा हुरुपमोड होतो.

सत्यवान : मग काही हरकत नाही. कारण निदान स्वतःला तरी तू मोहक वाटतेस म्हणून तुझे नाव मोहिनी आहे, त्या अर्थी खरे आहे. बरे, मोहिनीबाई, काय विनंती होती तुमची?

मोहिनी : एक ठेव ठेवायची होती दहा हजारांची. आपणासारखा सत्यवान् पुरुष कधीही कोणाची कवडी बुडवील, हे संभवत नाही. आपण अशा बायाबापड्यांच्या ठेवी ठेवून त्यांना उपकृत करता, असा आपला लौकिकच आहे. माझ्या सर्व मुलांची ही ठेवच आधार आहे.

सत्यवान् : ठीक आहे, द्या इकडे. हां हाडकुळ्या, तुमच्यासारख्या सत्यप्रिय आणि शूर शिष्याने परवा विनंती केली; ती तुमची, मी मान्य करतो आणि आजपासून आमच्या सत्यागारावर तुमचा पहारा ठेवतो. चला ह्या किल्ल्या घ्या, ही ठेव घ्या. चला मी सर्व कोठारे तुम्हाला दाखवितो. रात्री नीट पहारा ठेवीत जा.

देवीसिंह : आचार्यांच्या धनरक्षणाच्या कार्यी प्रामाणिकपणे झुंजून, वेळेवर हा हाडकुळ्या प्राणही देईल. सत्य हेच परब्रह्म, सत्य हाच धर्म, ही या हाडकुळ्याच्या रोमरोमी आता सत्यप्रीति, जशी काही भिनून गेली आहे. चला गुरुजी! (सत्यवानाचे इतर शिष्य त्याला उठताना पाहून.)

इतर शिष्य : बरे आहे गुरुजी, आचार्य, येतो आता.

सत्यवान् : (उसळून) काय? पुन्हा धडधडीत खोटे! अहो तुम्ही जायला निघाला, आणि येतो म्हणता? माझा सर्व उपदेश व्यर्थ गेला! हाय, हाय,! हया जगाला असत्याच्या रोगापासून मी कसा मुक्त करू?

देवीसिंह : मूर्खांनो खरे का नाही बोलत? खरे बोलण्याने आपल्या आत्म्याला समाधान होते, समाजात परस्पर विश्वास वाढतो, इहलोकी कल्याण, परलोकी कल्याण, मग सत्य का बोलत नाही तुम्ही?

सत्यवान् : तुझ्यासारख्या हडकुळ्या- एखाददुसऱ्या शिष्याचे सत्यप्रेम पाहून माझी निराशा अजून झाली नाही. नाहीतर मला केव्हाच निराशेने वेड लागले असते!

देवीसिंह : तरी देखील ते वेड, सत्याचंच वेड असते. सत्वेडा म्हणवून घेणे हा मी मानच समजतो. खरे आहे, जा आता तुम्ही सारे. चलावे आचार्य ! आता सर्व कोठार माझ्या रक्षणाखाली द्यावे सोपवून.

प्रवेश २ रा

(स्थळ : गंगाजीची माडी. पात्रे-नारंभट, गंगाजी.)

नारंभट : (स्वगत) त्या दारुड्या गड्याने, त्या मावशीचे पुरलेले धन जिथे पुरले म्हणून म्हटले, तिथेच ते सापडले! दागिने पण दागिने आहेत! गंगाजीची मागची बाकी चुकवून देणार हा पठ्ठ्या! आणि नवीन विलासाची उधार मागणार! तिकडे ती मावशी आता शंखनाद करीत असेल! पण त्या गड्याव्यतिरिक्त, तिचा संशय माझ्यावर येणे शक्यच नाही! आलीच गंगाजी. आज असा खुर्चीवर बसू. का गादीवर पडून राहू तिच्या?

गंगाजी : (प्रवेश करून) नारंभट, मागची बाकी?

नारंभट : गंगाजी, तोंड सांभाळून बोल. आज हा नारंभट हात हालवीत आलेला नाही समजलीस? ही घे मागची बाकी! हसली रे हसली! का झाली फिटंफाट? आता नवीन उधार थोडीशी? गंगाजी, हात जोडतो-एकच (चुंबन घेतो)

गंगाजी : तेवढ्यावर आज अधिकारच आहे तुमचा. बरे जा आता कसे पाहू? चार दिवस मला अगदी फुरसत नाही. मग या.

नारंभट : हे पहा, मी जातो, पण आता ज्याअर्थी मी मागची बाकी चुकती करून, वर देखील दोन तिने हजारांच गाठोडे, माझी वकिली करण्यासाठी तुझ्या न्यायालयात धाडले आहे, त्या अर्थी आता कमलिनीची एकदा भेट करविलीच पाहिजे.

गंगाजी : थोडे थांबा! बिचकलेले पांखरू बंदुकीचे वायबार काढीत बसल्याले का जवळ येत कधी? मी तिला चुचकारून जवळजवळ प्रेमात आणली आहे. एक दिवस ह्याच खिडकीशी अशी उभी वाट पहात मला विचारील, "गंगाजी, केव्हा ग येतील, नारायण भटजी?"

नारंभट : (मिटक्या मारीत.) काय ग तुझे हे रसाळे बोलणे? आज तिला पाहू तरी देशील का? तिचे ते डोळे किनई, गंगाजी, काय मारू आहेत मारू!

गंगाजी : नुसत्या पाहण्याचे काय? काल ती मला इतके देखील म्हणाली, माझ्या पायाच्या नखाचे चुंबन, नारंभटांना, तू म्हणशील तर घेऊ देईन.

नारंभट : अग, मग तू का म्हटले नाहीस, हो म्हणून?

गंगाजी : ती महारीण, तुम्हाला अस्पृश्यांना शिवण्याचा तिटकारा.

नारंभट : वेडगळे आहेस तू! अस्पृश्यतेचा खरा अर्थ म्हणजे अस्पृश्यांनी आम्हाला शिवू नये. आम्ही मनाला वाटले तरी त्यांना शिवू नये असा काही निर्बंध नाही. जा, जा आण तिला.

गंगाजी : पण पायाच्या नखाचे चुंबन?

नारंभट : अग, रतिशास्त्रात तेच सर्व चुंबनात कुशल प्रणयाच चिन्ह समजल जात. कारण तोंडावरच चुंबन घेऊन मग गडबडत, खाली घसरून मानिनीच्या पायावर पडण्यापेक्षा, प्रथम पायाचे चुंबन घेऊन अशा पायधरणीनेच मनधरणीकडे चढत जाणे हेच प्रणयाला आपले साध्य अचूक सत्वर आणि सलीलपणे प्राप्त करून देत. आण, आण तिला, जा !

गंगाजी : आज नाही; चार दिवसांनी पायाच्या नखाचे चुंबन तर देववितेच तुम्हाला. आता जा पाहू कसे?

नारंभट : जातो. पण एक मात्र अट की, इब्राहिम किंवा देवीसिंह यांच्या दृष्टीला, तिच्या पायाचे नख देखील न पडले पाहिजे; मी पैसे दिले आहेत; कमलिनी माझी झाली!

गंगाजी : त्याची नको तुम्हाला चिंता, त्या मेल्यांना उभे करणार नाही इथे! ह जा आता. पुन्हा लोचटपणा? चालते व्हा. (नारंभट जातो.) (पडदा उघडतो.)

गंगाजी : (स्वगत) काय मेले निलर्ज्ज लोक! माझ्या सारखीच्या पाया पडतील. मी चेष्टेने म्हटले, कमलिनीच्या पायाच्या नखाचे चुंबन देवविते, तर त्याच्या तोंडाला पाणी सुटले आणि गुप्तपणाने ही नीच कृत्य करणारे हे लोक त्या चोखा मेळ्याला ‘महार महार’ म्हणत; आणि तो मुलींवर पापी दृष्टि ठेवतो म्हणून आरोप करीत त्याला धक्के मारून हाकून देताना, कसे अगदी धर्माचे धर्मवीर बनून बतावणी करतात पहा! ह हे आले दुसरे धर्माभिमानी ! (देवीसिंह येतो.) ह, चालते व्हा आलात तसे; बुडाऊ मनुष्याच मी तोंड पाहत नसते. मला आज काम आहे, जा!

देवीसिंह : आज तुला काम आहे ना? वा! तर मग हीच इथून न जाण्याची वेळ. तू निष्काम असशील तेव्हा, तुझ्याशी शृंगाराच्या लीला करण्याइतका, हा देवीसिंह दुष्ट नाही हो! आत्ता तुला काम आहे, आणि माझ्या अंगात पण तो आत्ता शिरला आहे; म्हणून तर हीच लग्नघटि- घालू मिठी! हे तरी पहा एकदा (थैली पुढे करतो) झाले? फिटली अं तुमची बाकी. अग त्या सत्यवानासारखे सत्वेडे लोक हया जगात आहेत तोवर, तुझी बाकी फेडण्याला आम्हाला काय कठीण? त्याने आपण होऊन मला पहाऱ्यावर नेमले! चोराच्या हातातच किल्ल्या दिल्या

गंगाजी : दुष्टा! आणि मग त्या किल्ल्या तू-

देवीसिंह : प्रामाणिकपणाने पुन्हा त्याच्यापाशी जशाच्या तशाच परत केल्या. केवळ पेटीतले सोने तेवढे हे धर्मार्थ, ह्या गंगाजीच्या घाटावर आणून अर्पण केले. कोण्या मोहिनी नांवाच्या बाईने त्याच दिवशी ही ठेव तिथे ठेवली होती.

गंगाजी : देवीसिंह, पण ज्या बाईने ही ठेव ठेवली, तिच्या मुलामाणसांना भिकेला लावलंस ना तू, तिचे हे धन चोरून? तुला दुःख वाटते नाही तिचे केविलवाण क्रंदन ऐकून?

देविसिंह : दुःख तर काय? रडू देखील येत. पण माझ्या अश्रूंची दर दिवशी अशी उधळपट्टी करणे मला बरे वाटते नाही. जोपर्यंत त्या सत्यवानासारखा मूर्ख साधूंच्या छंदाला लागणाऱ्या भाबड्या लोकांना झालेला रोग बरा झाला नाही, तोवर मी माझी ही सर्व व्यक्तिशः दुःख दाबून टाकीत आहे. जेव्हा जगातून भाबडेपणा नष्ट झाल्याने, लुच्चेपणाला कोणत्याही नव्या बाया बापड्यांना फसविणे अशक्य होईल; तेव्हा मी तोवर नागविलेल्या सर्व कुटुंबांच्या दुःखाने एकत्रच हळहळून; माझे अश्रु एकदमच खर्च करणार आहे; जसा काटकसरी शहाणा गृहस्थ, दहा पांच लग्ने एकाच मंडपात उरकून घेतो. बरे, आता बाकी चुकती केली आम्ही! आता- कमलिनी?

गंगाजी : आठ दिवसांचे आत तुझी! आताशा तुझे नाव काढले म्हणजे गालातल्या गालात हसते थोडीशी, पण थोडा आणखी थांब!

देवीसिंह : चिंता नाही, पण मध्यंतरी त्या भटुरड्या नारंभटाला वा इब्राहिमाला मात्र, तिचे नख देखील दृष्टिला पडू देऊ नकोस हो, गंगाजी!

गंगाजी : ती नको तुम्हाला चिंता, फिरकू देत नाही त्या मेल्यांना इथे! जा आता, बरोबर आठव्या दिवशी या. कमलिनी तुमची. ह जा आता. (तो गेल्यावर) काय मेला भंगड आहे तो सत्यवान्? असल्या अस्सल चोरांच्या हाती, बायाबापड्यांच्या ठेवी ठेवलेल्या किल्ल्या देतो. आग लागो मेल्या त्या सत्याला की, जे दीन आणि सरळे साधुजनांना दुष्टाच्या पाशात फशी पाडत. कितीक कुटुंबं आज अन्न अन्न करून मरतील या सत्यवानाच्या नावाने खडे फोडीत, ते एक देवाला ठाऊक हे- हे आले तिसरे उल्लू! (इब्राहिम येतो.) काय खानसाहेब, एक फक्कड बातमी हवी का?

इब्राहिम : कमलिनी मेरे साथ प्यार करनेको लागली, हीच बात ना?

गंगाजी : ठीक ताडलंत, आठ दिवसांनी या पलंगावर प्रथम, आणि नंतर तुमच्या शयनगारात, कमलिनी तुमच्या दुलर्भ प्रेमाचे मनोरथ पूर्ण करील पण-

इब्राहिम : ए घे तेरी पण! बस्स. आता सगळी बाकी चुकली. आता या आठ दिवसांत कमलिनी हवी. हे पहा गंगाजी, माझा हात त्या देवीसिंहाच्या आणि नारंभटाच्या दगडाखाली अडकला आहे. त्यांच्याशी उघड लढू, तर ते कमलिनीची गोष्ट सुभेदाराला कळवतील. सुभेदारांना कमलिनी कुठे आहे हे कळावयाचा अवकाश की, ते तिला स्वतःच्या अंतःपुरात कोंबतील आणि इब्राहिम पुनः आपला हात हालवीत आणि तुझ्या दारापुढे शिट्या मारीत रात्र काढील. गंगाजी, आता तूच माझी सासू आहेस, आई आहेस, माता आहेस, पिता आहेस.

गंगाजी : (त्रासून) आता तुमचा हा नेहमीचा पाल्हाळ पुरे झाला, थोडक्यात म्हणजे नारंभटाच्या आणि देविसिंहाच्या तोंडाला पाने पुसून, आणि कमलिनीचे मुसलमान व्हायला मन वळवून, तुमच्याशी लग्न लावून द्यायचे ना? ते काम माझे! ह जा आता. त्याची तुम्हाला मुळीच चिंता नको.

इब्राहिम : बिलकुल ठीक बतलाया तुमने. एकदा लग्न लावले की मग, सुभेदाराचा बाप तिला माझ्यापासून सहज नेऊ शकणार नाही. सगळे मुसलमान माझा पक्ष घेतील. आता चोरून मारून एखादे दिवशी तिला नेलीच, तर मेहुणाच आहे माझा!

गंगाजी : हे लावलंत पुन्हा पाल्हाळ! चला जाते मी आत आता. ह, चला आठव्या दिवशी सगळे उरकते. जा. (इब्राहिम गेल्यावर) आणि आता खरच उरकते सर्व आठ दिवसांच्या आत. आज जमलेली सर्व रोकड, एका कमलिनीच्या आकर्षणाची करामत आहे. नाहीतर हे मेले बुडवे, थोडेच असे सुखासुखी मला सोन्याच्या लडीच्या लडी देणार होते? हे धन कमलिनीच्या रूपाची ओवाळणी- म्हणूनच मी ते तिच्या पदरात- तिच्या मानलेल्या आईचे स्त्रीधन म्हणून टाकणार आणि चार पांच दिवसांत सर्व संपत्ति घेऊन, माझ्या त्या दत्तक स्वयंवृणीत, म्हणूनच अत्यंत आवडत्या मुलीसह काशीयात्रेला निघून जाणार! हे सर्व या तिघा बदमाषांची आपसांत झुंज लागली नाही तोवर साधले पाहिजे. जर का हे रेडे आपसांत टक्करले की, कमलिनीची गोष्ट सुभेदाराच्या कानावर जाऊन, मला तिचे रक्षण करणे केवळ अशक्य हेईल. इथेपर्यंत डाव ठीक पडला. आता काल जी एक बातमी कानावर उडत आली, ती मात्र काय घोटाळा करील ते सांगवत नाही. कमलिनीचा प्रियकर शंकर आणि तो मुसलमान व्हावा मला नाही वाटते खरे, पण न जाणो! जर खरे असेल तर ते न कळविताच तिला येथून घेऊन जावे, की ते तिला कळवावे?

कमलिनी : (घाईघाईने प्रवेशून) ताई! ताई! तो दारावरून चाललेला मनुष्य- तो तरुण- तो मनोज्ञ युवा- ताई, तोच माझा शंकर, मुसलमान वेषात आहे- क्वचित् मला गुप्तपण शोधीत फिरत असावा. परंतु मी त्या वळणापासून त्याला निरखून पाहत आहे- तो शंकरच, बोलव, तो जाईल देखील!

गंगाजी : (पडद्यात जाऊन येते.) धाडते बाळे बोलावू! येतोच आहे तो बघ. पण तो ज्या अर्थी मुसलमान वेषात आहे, त्याअर्थी, लडिवाळे मुली, जरा धीराने घेतल पाहिजे. एकसारखी एक मनुष्ये नसतातच असे नाही. भलत्याच मनुष्यापायी तुझा हा गुप्त निवास प्रकट झाल्यास अनर्थ कोसळेल- उद्या सकाळचे आत, तो दुष्ट सुभेदार बंगषखान, तुला शयनगाराचे शिरोभूषण करून ठेवील.

कमलिनी : थूः त्या मेल्याच्या शिरावर आणि भूषणावर? पण ताई, हा शंकरच! आता मला धीर निघत नाही. ताई! कोण ही देवाची लीला! माझा प्रियकर आज मला भेटणार!

पद

आज मजला जिवलग गे माझा पहा हा ।।

भेटणार, ताई ताई, येई घेउनी अहाहा ।।

गंगाजी : ह आलाच तो. धीर धर. कमलिनी, तुझ्या मनःस्थितीची मी वारंवार केलेली वाखणणी खोटी पडणार नाही. असा धीरोदात्त चित्तवृत्तिनिरोध करून बाजूला उभी रहा-जोवर मी तुला हाक मारली नाही तोवर- (कमल बाजूला उभी राहते.) (दरवान शंकरला घेऊन आणि तेथे सोडून परत जातो.) बसावे! अनोळखी मनुष्याने बोलावले याचा राग नसावा.

शंकर : मुळीच नाही. कारण एक माझ्या ओळखीचे मनुष्य हरवल्याने त्याच्या शोधासाठी मी होऊन अनेक अनोळखी ठिकाणी जात असतो. आपला निरोप येताच माझ्या हृदयात अकस्मात् अपेक्षेची धडधड सुरू झाली - वाटले माझ्या ओळखीच्या कोणा मनुष्याने- क्वचित् जिला मी त्रिखंड शोधीत फिरत आहे, त्या माझ्या कमलिनीनंच तर मला बोलावले नसेल!

कमलिनी : (स्वगत) अगबाई! हा शंकरच! घुसू का अशी आता पुढे आणि पडू का त्या माझ्या प्रियकराच्या कंठात! पण मेला हा मुसलमानी वेष! माझ्या दोन्ही हातांनो, माझ्या हृदयाला घट्ट धरून ठेवा अस्सं. नाहीतर मला ताई, अधीर वृत्तीची म्हणून धिक्कारील.

गंगाजी : आपले नाव मला कळेल का? क्वचित् आपणाला माझ्या हातून काही साह्य होण्याचा संभव आहे.

शंकर : माझे नाव सिकंदरखान.

गंगाजी : आणि ज्यांच्यासाठी आपण त्रिखंड शोधीत फिरत आहा म्हणून म्हणालात, त्यांचे नाव कमलिनी? पण ते तर हिंदु नाव आहे?

शंकर : आणि माझंही नाव शंकर असे हिंदूच होतं

गंगाजी : शंकर हे नाव होते तर आपले? मग असले सुंदर नाव का टाकलंत?

शंकर : सुंदर नाव का टाकलंत? यासाठी की, जोवर ही नावे आणि त्यातील अंतर्हित हिंदुत्व माझ्या अंगाला एखाद्या रक्त शोषणाऱ्या जळूसारखे बिलगल होते तोवर, जळूसारखंच माझ्या अंगातून रक्तच नव्हे, तर माझ्या संसारातून सुख, माझ्या लौकिकातून मान आणि माझ्या आत्म्यातून आनंद शोषून पिऊन टाकीत होते. पण ते नाव आणि ते हिंदुत्व मी, विषारी सापासारखे माझ्या कल्पनेच्या वारूळातून बाहेर उपसून, ठेचून, दूर फेकून देताच, हा पहा मी महाराचा मनुष्य झालो! मी असे ऐकले आहे की, कमलिनीनंही त्या आत्मघातकी नांवाचा नायनाट केलेला असून, माझ्या प्रमाणेच मुसलमानी धर्म स्वीकारला आहे!

कमलिनी : (स्वगत) ज्या चांडाळाने कमलिनी बाटल्याची बातमी शंकराला दिली, त्याची जिव्हा गळून का पडली नाही? आणि शंकर बाटल्याची बातमी जी जिव्हा एवढ्या डौलाने आज कमलिनीला देत आहे, ती पण अजून झडून का पडत नाही? (मृदुल स्वरांत) पण कमलिनी, तुझा हा शंकरच ना ? मग त्याला तूच जर असे टाकून बोललीस, तर त्याने समाधानासाठी कोणाकडे जावे? प्रियकर तो माझा!

गंगाजी : पण शिकंदरखान, जर ही बातमी खोटी असली तर?

शंकर : तरी काय झाले? देवांना साक्ष ठेवून ज्या कमलला मी वरण्याचे वचन दिले आहे, तिला मी वरणारच!

कमलिनी : (स्वगत) अगबाई, देवांना मानतो हा माझा प्रियकर अजून मग मी उगाचे त्याला कठोर शब्द बोलून गेले. हे मुसलमानी नाव माझ्या शोधासाठी छद्मवेश म्हणूनच केवळ स्वीकारलेले असावे. माझा शंकर हिंदुच आहे!

शंकर : माझ्या कमलेला मी वरणारच, माझ्याप्रमाणे तिलाही मुसलमान करणारच. आणि महारवाड्याच्या नीचगर्तेतून काढून तिला राजवाड्याच्या उच्चतेवर विराजविणारच!

कमलिनी : (स्वगत) छेः हा राक्षस माझा शंकर नाहीच मुळी. हा कोणी शिकंदरच असेल. माझ्या डोळ्यांनी मला फसविल. चर्मचक्षूंना हा शंकर भासला पण मनश्चक्षूंनी बरोबर ओळखले, मना, हयाच्यासाठी इतःपर झुरू नकोस!

शंकर : बोला तर- जिच्यासाठी मी विव्हळे झालेला आहे, जी माझी बालत्वाची सवंगडी होती, जी माझ्या कैशोरातील सखी, आणि जी माझ्या भविष्याची गृहिणी होणारी आहे ती माझी कमलिनी कुठे आहे, हयाचा तुम्हाला काही पत्ता आहे का?

कुणि पाहियली का कुठें प्रिय सखी माझी ।। ध्रु.।।

काळे डोळे वदन मनोहर, केश सडक भरदार । अशी सुकुमार ।। १ ।।

कमलिनी : (स्वगत) आता शंकाच नको. हाच माझा शंकर, आणि मीच ती ह्याची कमलिनी! माझ्या हातांनो, माझ्या हातातून निसटून त्याच्या गळ्यांत पडा! थांबा पण- नीट पहा तो शिकंदर तर नाही ना?

गंगाजी : कमल-

कमलिनी : (उघड) ओ! ताई (पुढे येते)

शंकर : हीच ती माझी कमलिनी! अहो हीच ती! कोण हे सुख. माझ्या कमलिनी, चल तूच माझी कमलिनी (अलिंगनास पुढे येतो.)

कमलिनी : पण हाय रे दैवा! तू मात्र माझा शंकर नाहीस!

शंकर : अशी भितेस का? मीच तो तूझा पूर्वीचा शंकर! मीच आताचा शिकंदर! कमलिनी! इतक्या हालअपेष्टा काढून तुझा शोध करीत आलेला आणि तुझ्या भेटीसाठी कासावीस झालेला, हा तुझा शंकर- हा शिकंदर- आता एक पळे देखील विरह सहन करू शकत नाही. चल?

कमलिनी : आलेच. ही, प्रियकरा. घ्या या आपल्या कमलेला पदरात (हात पुढे करून जाते तोच त्याला निवारून कठोरपणे म्हणते) नाही पण. कोण प्रियकर? शंकर, की शिकंदर? दोन्हीही एकत्र राहू शकत नाहीत. दोन्हीही प्रियकर होऊ शकत नाहीत. पायांनो, थांबा ! स्वर्गाच्या शिखरावर म्हणून जे पाऊल टाकू पाहात आहा, ते क्वचित् घसरून नरकाच्या खोल गर्तेत तुम्हाला नेऊन टाकील.

शंकर : ये, ये सखये. आता अंत पाहू नकोस. अशी भितेस कशासाठी?

कमलिनी : त्या संतापदायक वेषासाठी! त्या पतित अहिंदु वेषाची मला भीति वाटते!

शंकर : तर मग, तू अजून हिंदुच आहेस की काय?

कमलिनी : आणि तू आता हिंदु नाहीस की काय? बोल, स्पष्ट बोल? तुझ्या उत्तराच्या एका निःश्वासावर माझ्या आयुष्याच, सोने अथवा माती होणे अवलंबून आहे! बोल, पण दुरून बोल! त्या दुष्ट वेषाची आणि जे हिंदु धर्माविरुद्ध भयंकर प्रलाप इतका वेळ तू काढलेस, त्या विचारांची सावली माझ्यावर न पडेल, इतक्या अंतरावरून बोल.

शंकर : नाही, मी आता हिंदु नाही. तू आणि मी हिंदु असताना जे नीचयोनित्वाच भूत आपल्या मानगुटीला बसले होते, ते आता या मुसलमानी वेषाच कवच घालताच, मला शिवू देखील शकत नाही. कमल, या वेषाने नवे भय उत्पन्न होते नाही; तर असलेले भय दूर पळत; कमलिनी, तू हा वेष घाल, या विचाराचे मर्म धारण कर, आणि मजबरोबर ज्या मार्गाने तू त्या कारंज्यावर चालते आलीस त्याच मार्गाने चल. त्याच घोड्यावर तेच तुला बसवतील; की ज्यांनी तुझ्या सावलीत घोडा देखील विटाळतो म्हणून म्हटले होते. त्याच कारंज्यावर तू स्नान कर, त्याच ब्राह्मणाच्या रुमालाला तू तोंड पूस, आणि त्याच क्षत्रियाच्या गुडघे मोडून केलेल्या सलामांचा स्वीकार कर, कारण मी आता शिकंदरखान आहे. मी शिपायांचा नाईक झालेला आहे! आणि तू माझी स्वयंवृणीत पत्नी आहेस!

कमलिनी : शिकंदर, हे पापी शब्द पुन्हा बोलू नकोस! मी शंकराची स्वयंवृणीत अर्धांगी आहे. शंकर-प्रियकरा (अकस्मात् कठोरतेनं) शिकंदर, नीचा (पुन्हा मृदु स्वरात) अगबाई, कोण हा माझा दुष्टपणा? माझा प्रियमित्र, माझा सखा, माझा दयित हा शंकर, एखाद्या मौल्यवान् हरवलेल्या रत्नासारखा मला पुन्हा गवसला, त्याला मी हे काय बोलले ? शंकर - (पुन्हा पुढे जाऊ लागते.)

शंकर : कमलिनी, थांबू नकोस; ये. जरी माझा हा वेष तुला भयंकर पाप वाटते असले तरी हे ध्यानात धर की, ही तुझ्या प्रेमाचीच एक छाया आहे. तू मुसलमान झालीस, हे ऐकून, निदान तुझ्या जीवनातील दुःखापासून तुझी सुटका करावी, या हेतूने मी हिंदुधर्माचा त्याग केला आहे.

कमलिनी : तर मग मी तुझा अधिकच तिरस्कार करते. हिंदुत्वाचे मूल्य माझ्यासारख्या दुर्गंधपूर्तियुक्त एका यःकश्चित् मुलीवरच्या प्रीतीहून जो अधिक समजला नाही, तो अधमच असला पाहिजे! तत्वासाठी उभय धर्मांचा अभ्यास करून कोणी एखादा जर हिंदुत्व सोडून मुसलमान झाला; तर मी त्याला फार तर मतिमंद म्हणेन; पण धिक्कारणार नाही. परंतु, जो दुःख टाळण्यासाठी म्हणून कोणा नरकाच्या सोनेरी रांजणाला भुलून, किंवा केवळ व्यक्तिगत छळाचा सूड घ्यायचा म्हणून आपल्या हिंदुधर्माला लाथाडतो-

त्याच्या नीचपणाची पराकाष्ठा झाली असे मी समजते! मी त्याच्या छायेलाही उभी राहणार नाही. ताई, मला धर, माझे अवयव एकमेकांविरुद्ध कसे बंड करू पाहत आहेत. माझा देह माझ्या शंकराच्या आलिंगनाच्या अमृतपानासाठी कासावीस होऊन, पतंगासारखा त्याच्यावर झेप घालू पाहत आहे. माझा आत्मा, मला "तू मरशील तो शंकर नाही; तो शिकंदर नांवाचा रौरवाग्नि प्रज्वलितपणे उभा आहे" असे म्हणून मला खेचीत आहे! कारण हा हिंदुधर्मापासून पतित झालेला महापातकी शिकंदर आहे!!

शंकर : हिंदुधर्मापासून पतित 'नव्हे' तर हिंदुधर्मात असताना जो पतित होता; तो आज पावनच नव्हे, तर पावक होऊन तुझ्यासमोर उभा आहे. जेव्हा तो शंकर होता; तेव्हा त्याच्या सावलीत घोड्याला विटाळ होई! आज तो घोडेस्वार झालेला असून ते, विटाळ, विटाळ म्हणून ओरडणारे क्षत्रिय, वैश्य त्याच्या घोड्याचा खरारा करीत; ते बघ खाली दाराशी उभे आहेत! सांग! आता हे माझे पतन की उद्धार?

कमलिनी : 'घोड्यावर बसणे' म्हणजे जर उद्धार असेल तर गोमाशांच भाग्य राजाहूनही अधिक समजल पाहिजे. गोमाशा रात्रंदिवस घोड्यावर स्वार झालेल्याच असतात! शंकर, जर तू हिंदु महार म्हणून, तू महार हिंदू म्हणून, माझे हिंदुबंधु तुला हस्तस्पर्श करते, मनुष्याप्रमाणे समानतेने वागविते, घोड्यावर बसू देते, आणि प्रेमाने तुझ्या पाठीवर हात फिरविते, तर मात्र मी तुझी ही खरी उन्नती मानली असती; परंतु हे हिंदु क्षत्रिय, वैश्य तुझ्या घोड्याचा खरारा, तू महार त्यांचा धर्मबंधु म्हणून करीत नसून, तू मुसलमान म्हणून करीत आहेत. या स्थित्यंतराने त्या माझ्या हिंदु बंधूंची आत्मघातकी कापुरुषता जितकी व्यक्त होते आहे त्याहून दसपट, स्वजातीच्या अवनतीने संतुष्ट होणारी तुझी स्वधर्मद्रोही नीचता व्यक्त होते आहे! माझा शंकर हिंदु होता- तू मुसलमान आहेस!

शंकर : तर मग कमलिनी, तो तुझा हिंदु शंकर आता हया जगात राहिलेलाच नाही! जो आहे तो हा शिकंदर आहे!

कमलिनी : मेल्या, जळो तुझी ती अभद्रवाणी! माझा शंकर आहे, हिंदु आहे- हया जगात आहे आणि जोवर हे कमलिनीच हृदय जीवनाने स्फुरत आहे, तोवर तो तसाच चिरंजीव राहणारा आहे! ताई, माझा शंकर आहे, माझ्या गळ्याची शपथ, आहे- त्या प्राजक्ताखाली उभा आहे- ज्या प्राजक्ताखाली- ताई तुला माहीती आहे का? की त्याने मला, किसन- तो -मी आम्ही लपंडाव खेळत असता, हसत धरले आणि अकस्मात् पोटाशी घेतल आणि अकस्मात् कुण्या नवीन देवाने माझ्या हृदयात प्रवेश केला. मी त्याच्या बाहूत बाहू गुंफून अश्शी (शंकरकडे जाऊ लागते.) (इतक्यात मल्हार गायकवाड येतो.)

मल्हार : सलाम, शिकंदरखान साहेब!

शंकर : कमलिनी, हा पहा- माझ्या हाताखाली सुभेदाराने दिलेल्या पथकापैकी, एक क्षत्रियकुलावतंस मराठा, पहा किती लवून सलाम करीत आहे! क्या है गायकवाड घोडा आणला आहेस हमारा? मल्हार, बोलो!

मल्हार : हां जी खानसाहेब! आणि सुभेदारांनी आपणाला तातडीने बोलवले आहे, हा निरोप पण सांगायला आलो आहे?

शंकर : ठीक है! हे पहा, ही माझी स्वामिनी आहे. तिला पण माझ्या अधिकाराला योग्य असा लवून मुजरा कर, आणि मग जा (मल्हार मुजरा करायला जातो तोच कमलिनी म्हणते-)

कमलिनी : (मागे सरकून) छे, छे पाटिलबुवा. मी एक महाराची मुलगी आहे, आपण मला हिंदु महारीण- आपली एक धर्मभगिनी- म्हणून मुजरा केल्यास, मी तो कृतज्ञतापूर्वक स्वीकारीन. परंतु तुम्हाला फसवून तुमच्या धर्म समजुतीवर आघात करणार नाही.

शंकर : गायकवाड, मुजरा करतोस की नाही?

मल्हार : आम्ही हिंदु, उच्चवर्णीय मराठे, महारणीला मुजरा कसा करणार?

शंकर : मला कसा केलास, मी महारच होतो.

मल्हार : पण आता तुम्ही हिंदुधर्म सोडला आहे. त्याही हिंदुधर्म सोडून तुमच्याशी विवाह करतील, तर आम्ही त्यांसही मुजरा करू. मुसलमानाला आम्ही जातिवंत हिंदु, मान दहादा वाकवू. पण महारांना, ते हिंदु आहेत तोवर नाही वाकवणारे मान? ही आमची हिंदूची रूढि आहे.

कमलिनी : आणि आपल्या हिंदूच्या आजच्या चालत्या रूढींप्रमाणे, पाटील ही महाराची पोर, आपणाला दुरून प्रेमाचा जोहार करीत आहे.

शंकर : (स्वगत) हिला लहानपणच्या संस्कारांनी अजून पूर्णपणे पछाडलेले आहे. एखाद्या भूतबाधा झालेल्या रोग्याला जसे अपघातापासून बलात्काराने बचावावे लागते, तसे मी हिला बळाने महारवाड्यातून उचलून, महालात नेणार, हिंदूची मुसलमान करणार. (उघड) कमल, आज मी आता जातो. तू थोडा विचार कर. मी थोडेच दिवसात परत येईन. जाऊ का कमल? इतके दिवसांनी भेटून, कमल, हातात हात देखील धरू दिल्यावाचून मला परत धाडतेस ना?

कमलिनी : माझ्या हृदयाचे पाणी, पाणी होते आहे. शंकर, जाऊ नकोस. तो शब्द ऐकताच पूर्वीपासून डोळ्यांत अश्रू उभे राहण्याची मला सवय झालेली आहे, म्हणून शंकर जाऊ नकोस.

पद

जगेन ना जगेन ना जगेन ना । प्रियाप्रती आलिंगिल्याविना ।

पिजऱ्यात जरि देह तरी हे । प्राणपाखरू उडुनि जाउनि ।

जगेल ना जगेल ना जगेल ना । प्रियाप्रती आलिंगिल्याविना ।। १

ये शंकर-(धिक्कारून) शिकंदर, तू मात्र चालता हो!

शंकर : जाणार नाही. तुला आलिंगिल्यावाचून जाईन तर मला वेड लागेल!

(बळाने तिला धरू लागतो.)

गंगाजी : ह, सावध? शिकंदर, बलात्काराने त्या हिंदु मुलीला, माझ्या मानलेल्या कन्येला स्पर्श करू नकोस? नाही तर, आत्ता माझ्या रक्षकांना मी आत बोलावून, इथे रक्ताचे पाट वाहवीन! चला, चालते व्हा.

शंकर : (स्वगत) ही माझी चूक होते आहे. हिला सध्याच बिचकविल्यास, हे हरिण हातातून निसटून जाईल, दुसरे, कुठे पळून जाईल. सुभेदाराला सांगून सर्व पथकासह, हया घरावर अकस्मात् छापा घालून हयांना धरणे हाच अत्युत्तम मार्ग. आता मी काही हिंदु राहिलो नाही; तेव्हा कोणालाही धर्मापासून बलात्काराने च्युत करायला मला काही एक हरकत नाही. मी मुसलमान झालो आहे. आता सर्व महारांना, सर्व अस्पृश्यांना, शक्य तर सर्व हिंदूना तरवारींचे पाणी पाजून, काफराचे काजी बनविणे, हे माझे ब्रीदच झालेले आहे. (उघड) क्षमा करा बाई; झाली गोष्ट झाली नाही असेच समजा. मी पुनः या वाटेला कधी जाणार नाही. शंकराच्या हातात एकच कमल होते; शिकंदराच्या गळ्यात माळ होऊन रुळण्यासाठी, अनेक कमल झुरत आहेत. तुम्ही सुखाने इथे नांदा. आम्ही इतरत्र नांदू!

(जातो.)

प्रवेश ३ रा

(स्थळ- बंगषचे विचारालय. पात्रे : बंगषखान)

बंगष : आजपर्यंत हिंदु लोकांच्या बागेतील, अनेक कोमल फुले, ह्या सुभेदार बंगषखानाने खुडून त्यांच्या तारुण्याच्या बहराचा उपभोग घेतला. ती सर्व फुले आता शिळी झाली. म्हणून आज साऱ्या फुलांची राणी, जी कमल, तीच आज माझ्या चरणावर वाहिली जाणार! मला गुणगुण कळलीच होती; की, इब्राहिमने काही लोकांच्या साह्याल, कुणी एक अत्यंत सुस्वरूप अशी हिंदु कन्यका पकडून, माझ्या दृष्टिला पडू नये म्हणून लपवून ठेविली होती. परंतु आज त्या उल्लू शिकंदराने - त्या पूर्वीच्या शंकर नावाच्या धेडाने - आपण होऊन मला तिचा पत्ता दिला! आता इब्राहिमला किंवा त्याच्या साथीदारांपैकी कोणालाही, हया गोष्टीचा सुगावाही न लागू देता मी, एकदम छापा घालून ती कमलिनी पकडून आणणार! माझ्या हया छाप्याकडे त्याचे लक्ष मुळीच जाऊ नये म्हणून त्या इब्राहिमला मी चोख्याविरुद्ध हिंदु लोकांनी जी गाऱ्हाणी आणली आहेत त्यांचा विचार करून चोख्याला शासन करण्याच्या कामावर नेमून टाकतो; आणि ह्या उत्क्षोभक शासनाकडे सर्व जनतेच लक्ष इकडे वेधून गेले आहे तोच, तिकडे गुप्तपणे छापा घालून कमलिनीला धरून आणतो. हिंदूच्या जितक्या जितक्या अधिक स्त्रियांना मी बळाने वा छळाने धरून, माझ्या अंतःपुराची शोभा वाढवितो; तितक्या तितक्या पटीने मुसलमानांत माझी योग्यता वाढत जाते. ऐहिक सुखविलासांचा उपभोग जितका अधिक घ्यावा तितका पारलौकिक कल्याणाचा मार्ग अधिक सुखकर व्हावा असे धार्मिक साधन आजपर्यंत उपलब्ध नव्हते; ते या मौलवी जाफरअल्लीने मला गवसून दिले! मी इतक्या हिंदु मुली आजपर्यंत बाटविल्या आहेत आणि उपभोगिल्या आहेत की, शेकडो मुसलमान मला, इस्लामचा प्रचार करणारा, आणि इस्लामी संतति वाढविणारा, एक नवा धर्मवीरच मानू लागले आहेत! वाः! कामलंपटतेने धर्म बहुधा नासतो; परंतु या जाफरअल्लीच्या मंत्राने कामोपभोग जितका अधिक घ्यावा, तितका धर्मसंचय अधिक घडतो. कामाच्या भोगाने धर्म साधतो आणि धर्म साधण्यातच काम उपभोगता येतो! कुराणात काही का असेना, काफरांच्या कोवळ्या कन्यका उपभोगा! जाफरअल्लीचा हा मंत्र हेच माझे कुराण, हे आलेच मुल्ला मौलवी इकडे! (पडदा वर जातो) (जाफरअल्ली आणि मुल्लाजी येतात.) बैठिये मौलवीजी, बैठिये मुल्लाजी! अच्छा, मौलवीजी, चोखामेळाके विषयमे क्या फैसला हुवा ! थोडक्यात लवकर सांगा कारण मला एका महत्वाच्या कामासाठी इतरत्र त्वरित निघून जायचे आहे.

जाफरअल्ली : हिंदु लोकांच्या रूढीत आपण राज्यकर्ते म्हणून ढवळाढवळे करू नये, असे म्हणणेच चुकीच आहे! आपण राज्यकर्ते झालो तेच हिंदु लोकांची सिंहासने चूर्ण करून आणि त्यांच्या क्षत्रियवर्गाला दास बनवून, म्हणजे त्यांच्या रूढि पायाखाली तुडवून, झालो! महमद गझनवी, महमद घोरी, अल्लाउद्दीन

खिलजी इत्यादी अनेक मुसलमानी धर्मवीरांनी, हिंदुलोकांच्या देवळांच चूर्ण केले, देवमूर्तींना मशिदीच्या पायऱ्या केल्या, लाखो हिंदूच्या कत्तली उडवून वा बळाने त्यांना मुसलमान करून, त्यांच्या कन्यकांना आणि स्त्रियांना आपल्या बटकी बनविल्या, म्हणूनच तर आज एक इस्लामच नवीन जग हिंदुस्थानात अस्तित्वात आले आहे. नाही का? तेव्हा इस्लामी प्रचाराला आणि प्रसाराला अवश्य वाटेल तेव्हा, हिंदु रूढीच काय हिंदु धर्म देखील उघडपण नष्ट करणे, आमचे ब्रीदच आहे. पण ते करण्याची शक्ति नसेल तेथे, इस्लामी प्रचार प्रच्छन्न उपायांनी केला पाहिजे. त्यांत एक उपाय म्हणजे, त्यांच्यातील आत्मघातकी रूढीला उत्तेजन देणे हा होय. चोखा मेळ्याने मुसलमानी धर्मप्रसाराला फारच अडथळा केला आहे. पांडुरंगाची भक्ति हाच मुक्तीचा सोपा मार्ग असे शिकवून, आणि हिंदुधर्मातील उच्च तत्व अस्पृश्यांना आपल्या आचरणात उतरवून दाखवून ह्याने त्यांना हिंदु धर्माचे कट्टर अनुयायी बनविले आहे. रोहिदास, चोखा यांसारखे संत जर अस्पृश्यांत न निघते तर, हजारो चांभार, महार, मांग, आज मुसलमान झाले असते.

सुभेदार : मग या चोख्याला मुसलमानी धर्मघातकी म्हणून का मारू नये?

जाफरअल्ली : नाही! असे केल्याने त्याच्याकडे सर्व हिंदु लोक आदराने पाहू लागतील. अस्पृश्य देखील त्याला धर्मवीर समजतील. परंतु आपण स्पृश्यांचा पक्ष घेऊन चोख्याला मारावे, म्हणजे स्पृश्य आपल्या राज्याचे हितचिंतक होतील. आणि चोख्यासारखा, महारवाड्याकडे जाणाऱ्या इस्लामच्या मार्गातील एक विषारी काटाही चिरडून टाकला जाईल.

मुल्लाजी : परंतु त्यायोगे अस्पृश्य आम्हा मुसलमानांविरुद्ध अधिकच चिडणार नाहीत का?

जाफरअल्ली : मी जिवंत आहे तोवर, ती भीती नको. कारण त्या सर्व छळाचे खापर, मी स्पृश्य हिंदूच्या डोक्यावर फोडून उलट सांगणार, बाबांनो! त्या महार संताची आम्हाला फार कीव आली. पण राज्यकर्ते म्हणून तुम्हा हिंदूच्या रूढि, आम्ही तुम्हाकडून पाळविल्या नाहीत; तर, तुम्हीच उद्या आम्हाला दोष द्याल. मुसलमान अस्पृश्यांना किती प्रेमाने वागवतात; हे पाहणे असेल तर, हिंदुत्व सोडा. त्यावाचून तुमचा छळ कधीही संपणार नाही. तुम्ही महारादिक,मुसलमान व्हा. मग बघू कोण तुम्हाला शिवत नाही ते? असे सांगण्याचा अवकाश की झालाच तो अस्पृश्य मुसलमान! मी अनुभवाच्या गोष्टी सांगतो आहे.

सुभेदार : बिलकुल ठीक है मौलवीजी! क्या मुल्लाजी, आपको कैसा लगता है?

मुल्लाजी : गुन्हा माफ! लेकिन मै तो सीधासाधा अल्लाका बंदा हूं! मला मौलवीची कूट नीति पसंत पडत नाही. इस्लामचा प्रचार अशा दुष्ट उपायांनी करणे, हे कुराण शरीफास कलंक लावण्यासारखे आहे.

हिंदुधर्मातही उच्च कोटीचे ब्रह्मज्ञान आहे. हिंदु लोकांतही साधुसंत उत्पन्न होतात. माझे कुराण मला उदारपणा शिकवत. त्याचा प्रचार उपदेशाने आणि प्रेमाने करावा. परंतु कूट नीती किंवा तरवारीची धार, किंवा अनाथ कन्यकांवर बलात्कार, हया साधनांनी ज्या धर्माचा प्रसार केला जातो, तो दैविक धर्म नसून दानवी अधर्म होय! असे-

सुभेदार : चुप रहो! मुल्लाजी, मी तुम्हाला बोलू देतो म्हणून, वाटेल ते भकू नका. हजारो मौलवींनी आणि धर्मवीरांनी आचरलेला धर्मच, मौलवी आणि मी आचरीत आहो. त्याच मार्गाने जात आहो. अच्छा, मौलवीजी, कहो इब्राहिमको! त्या सर्व हिंदु पुढाऱ्यांना त्यांनी पकडून आणलेल्या चोख्यासह आणा माझ्यापुढे. मला दुसऱ्या एका महत्वाच्या कामाला जाणे आहे. झटकाफटकी निकाल करून चाललो मी निघून -(मौलवी इब्राहिमला आणि चोख्याला ओढाताण करीत असलेल्या पाटील, नारंभट, देवीसिंह इत्यादि हिंदु लोकांना घेऊन येतात.)

हिंदु पुढारी : सुभेदार साहेब की जय, मुसलमानी सल्तनत की जय!

सुभेदार : हां! हां! बकवाज बस हुवा! अच्छा, तुम लोगोंकी क्या फिर्याद है! बोलो पाटील, तुम बोलो!

पाटील : (चोख्याचे डोक्यावर गुद्दा मारून) बोल, आता तूच बोल काय ते! देव तुझ्या घरी येऊन जेवतात नव्हे का? आम्हा क्षत्रियांच्या घरी त्यांना अन्न मिळत नव्हते. नाही, म्हणून ते भीक मागायला, तुझ्यासारख्या धेडाच्या घरी आले?

भिकुशेट : बोल (पाठीत चापटी मारून) देव तुझा हात धरून तुला देवळात नेतात नाही? सोन्याच्या कड्यांनी जड झालेला आम्हा वैश्यांचा संपन्न हात सोडून- गांव उकिरड्याच्या शेणखाईत लडबडलेला तुझा महारडा हात, ते प्रत्यक्ष येऊन धरतात, नाही का?

इतर : बोल! मेणघुण्या, बोल! देवाला बाटविलेस की नाही? हा विठोबाच्या अंगावरील हार, तुझ्या गळ्यात कसा आला? देवळात घुसतोस नाही? देव विटाळतोस?

चोखा : सज्जनहो, मज दीनाचा छळ का करता? मनुष्य विटाळविला जातो, हे एक वेळ मानता येईल, पण देवाला का कधी विटाळ होऊ शकत असतो? अस्पृश्यांच्या स्पर्शाने जर देव विटाळत असतील; तर ज्या दिवशी त्यांनी अस्पृश्यांना घडवले त्याच दिवशी ते विटाळले गेले! अहो! जरा विचार करा!

सोवळा तो कोण, ओवळा तो कोण । विटाळा कारण देह मूळे ।।

चोखा म्हणे देव, दोहींच्या वेगळ्या । तोचि म्यां देखिला दृष्टिभरी ।।

भगवान् मज भक्ताचे घरी येऊन जेवतात, मी नको म्हटले तरी माझ्या ताटातच बसतात, ही गोष्ट सत्य आहे. परंतु त्यायोगे, मज पतिताच घर पावन झाले, देव पतित झाले नाहीत. पांडुरंगाने मला मी अस्पृश्य आहे असे सांगत असताना, बळे बळे देवळांत नेले. परंतु त्यायोगें, न देऊळे पतित झाले, न देव; परंतु त्यायोगे, मी पतितच पावन झालो. अंधःकाराला प्रकाशाने स्पर्श करताच, प्रकाश काळवंडला नाही, तर अंधःकार प्रकाशमय झाला!

सुभेदार : ठीक है, चोखा, तुमने माना है की तुम देऊल मे गया था. और तुमारे देवके साथ खाना भी खाया. अच्छा, तुम हिंदु है या नही?

चोखा : हो! मी हिंदु आहे. मी हिंदु समाजाच्या पायातला एक पायपोस आहे. मी पांडुरंगाच्या प्रदक्षिणेची वाट झाडणारा झाडुवाला महार आहे.

सुभेदार : जर तू हिंदु आहेस; असे इतक्या डौलाने सांगत आहेस तर हिंदु महाराने देवळात जाऊ नये, अस्पृश्य जातील देवाला तर काय पण मनुष्याना शिवू नये हे हिंदु शास्त्रही तुला माहीत असले पाहिजे मग तू देव कसा विटाळलास?

चोखा : शास्त्रांचे तात्पर्य मला अज्ञजनाला काही केल्या कळेना. म्हणूनच तर मी, सकल शास्त्रांची ज्ञानगंगा ज्या चरणकमलापासून उदय पावली, त्या चरणांनाच शरण गेलो, आणि अस्पृश्यांनी भक्ति कशी करावी हा प्रश्न विचारला. मला देवळात जाता येईना म्हणून देवच माझ्याकडे आले आणि सांगते झाले.-

न पाहि मी उंच निच जातिकुळे । स्त्री शुद्र चांडाळे स्पृश्यास्पृश्य ।।

अग्नीला आहुति जशी गिळू शकत नाही, तसा पतिताचा स्पर्श, त्या पांडुरंगाला विटाळू शकत नाही. दारुड्या, चोर, किंवा वेश्यागामी स्पृश्यांच्या प्रवेशाने, विठ्ठलाच देऊळ भ्रष्ट होत नाही, आणि अस्पृश्यांच्या प्रवेशाने - मग तो अस्पृश्य कितीही निष्पाप का असेना, पण तो अस्पृश्य कुळात उत्पन्न झाला एवढ्यासाठी, - ते भ्रष्ट होते हे थोतांड आहे, असे प्रत्यक्ष देवाने मला सांगितले!

नारंभट : लुच्चा, ब्राह्मणांना दारुडे म्हणतोस? (त्याला पाठीवर मारतो.)

देवीसिंह : पाजी, क्षत्रियांना चोर म्हणतोस?

(डोक्यावर चोख्याला मारतो.)

भिकुशेट : धेडा, वैश्यांना वेश्या म्हणतोस? (तोंडात मारतो.)

चोखा : अयाई! देवा, देवा, माझ्यावर निष्कारण होते असलेले हे आघात आता तूच आपल्या ढालीवर झेल. भक्ताचा छळ इकडे चालला आहे आणि देवळात आपण स्वस्थ उभे आहात ना ?

(इतक्यात एक माणूस धावत येतो.)

पहिला मनुष्य : कोण आश्चर्य ! कोण चमत्कार ! देवळात पांडुरंगाच्या मूर्तिवर आघात होते आहेत! मस्तक सुजले! गालावर आणि पाठीवर अकस्मात् माराचे वळे उठले! (आकाशवाणी होते)

'माझ्या भक्तावर जो जो आघात होते आहे, तो तो, मला, देवाला लागत आहे,'

(दुसरा माणूस धावत येतो.)

दुसरा मनुष्य : अहो पाहता काय? धरा, धावा, शोधा? देव देवळातून एकाएकी नाहीसे झाले. कोणीतरी भयंकर चेटुक केले निश्चित!

पाटील : (घाबरून संतापून) अहो कोणी तरी कसले, ह्या ह्या धेडाची ही सगळी करणी! सुभेदार, प्रलयकाल ओढवेल; जर तुम्ही याला ठार मारणार नाही तर! आम्ही हिंदु, आम्ही याला मारले तर देवालाच लागते! पण तुम्ही मुसलमान तुम्ही हिंदूला मारले तर देवाला राग येणार नाही! मारा, मारा-

भिकूशेट : अगदी ठीक, विजयानगराच्या हया प्रख्यात तेलगू कर्नाटक साम्राज्यातील प्रत्यक्ष नृसिंहाच भव्य मंदिर मुसलमानांनी फोडले. पण देव त्यांच्यावर रागावला नाही, उलट त्यांना राज्यच देऊन टाकले. तेच एखादा आपला हिंदु नुसता एखादा नारळ फोडायला जरी विसरता, तरी नृसिंह त्याच्या बोकांडी बसायला सोडता ना?

सुभेदार : अच्छा है! इब्राहिम, हया पंढरीच्या सर्व हिंदु लोकांना मोठ्या पटांगणांत घेऊन जा. ह्या चोख्याला, देऊळे विटाळविले म्हणून बैलाच्या शिळवठ्याला बांधा, आणि भरधाव सोडा. दगडावर, सडकेवर आपटून, आदळून याच्या डोक्याच्या आणि प्राणांच्या चिंधड्या, चिंधड्या उडेतो बैलाला मार्गातून हुसकीत चला! जा! (सर्व हिंदु लोक, सुभेदार साहेब की जय! मुसलमानी सल्तनत की जय! असे ओरडत जातात आणि चोख्याला ओढीत नेतात.)

(पडदा पडतो.)

प्रवेश ४ था

शंकर : धिक्कार असो मला! महत्पापातून महत्तर पापात, आणि महत्तर पापातून महत्तमात - असा माझा एकसारखा खोल खोल भयंकर अधःपात होते चालला आहे! करायला गेलो काय आणि करून बसलो काय! माझ्या कमलिनीच्या महारड्या अस्पृश्यतेचा कलंक धुऊन, तिला सुखाच्या सिंहासनावर बसवावी; स्वेच्छेने ती बसत नसेल, तर बळाने बसवावी, म्हणून मी तिची बातमी सुभेदार बंगषखान याला स्वतः जाऊन दिली. परंतु माझ्यापासून तिच्या छळाची आणि सौंदर्याची ती बातमी ऐकताच तो बंगष, एखाद्या कुत्र्यासारखा वसकन माझ्या अंगावर आला, आणि म्हणाला काय- अशी ही सुंदर मुलगी तुला धेडाला, बाटग्या बटकीच्या पोराला पाहिजे, म्हणून मी तुला ती धरून द्यावी? सुभेदार बंगष मेला आहे की काय? तो जिवंत असताना सुंदर मुली धेडाच्या हातात पडणार नाहीत. असा धडधडीत अन्याय होणार नाही! असे म्हणून त्या कमलंपटाल, कमलिनीला स्वतःसाठीच धरून आणण्याची प्रतिज्ञा केली! हाय! हाय ! ते राक्षस क्वचित् तिला धरायला निघालेही असतील ! धिक्कार असो मला. मी होऊन तिचा पत्ता त्या दैत्याला दिला. आता ते काय काय छळ करतील? आता मी काय करू? हाय! हाय! अस्पृश्यतेच्या छळाला कंटाळून मी माझ्या हिंदुधर्माविरूद्ध बंड केले! अस्पृश्यता म्हणजेच हिंदुधर्म नाही, हे किसनचे आणि कमलिनीचे उद्‌गार आता मला आठवताहेत, पण तेव्हा पटले नाहीत. हिंदुच नव्हेत, तर तो मुसलमान बंगष देखील, मला बाटगा म्हणून धिक्कारिता झाला! कमलिनी, माझ्यातल्या शिकंदराची जरी तुला चीड आली असली, तरी माझ्यातला शंकर तर तुला अजून प्रिय आहे ना? त्या पापी शिकंदराच्या विटाळापासून आता माझ्यातला तो शंकर, शुद्ध करून घ्यायला काही उपाय आहे का? मी हिंदुधर्मासाठी जगेन, मी हिंदुधर्मासाठी मरेन, म्हणून उठणारी ती किसनची कृतनिश्चयी गर्जना, माझ्या हृदयात तोफेच्या गडगडाटासारखी अजून दुमदुमत आहे! नीचा, शिकंदरा! माझा किसन, माझी कमलिनी, माझी जन्मभूमि, माझी जाति, माझा धर्म- हे सगळे, नव्हे माझ्यातला मी देखील, तुझा पापी प्रवेश माझ्या हृदयात होताच, मला अंतरून मी पोरका झालो! आता माझ्यातल्या हया शिकंदराच्या कचाटीतून माझ्यातला शंकर कसा सोडवू! का त्या शिकंदराचा गळा दाबून घेऊ असा प्राण? (गळा दाबतो.) पण नको, हयापेक्षा एक उत्तम मार्ग आहे, तो म्हणजे धर्मशत्रूंच्या प्राणांचे बळी घेऊन मग आपला बळी देणे! मरणेच, तर माझ्यातील शंकराच्या हिंदु धर्माचे रक्षणासाठी, माझ्यातील त्या राक्षसी शिकंदराच्या दुष्ट सहाय्यकाच शक्य ते निर्दालन करीत मरण! परंतु पुढे काय! मेल्यानंतर काय! अरे, मला असे एकाएकी भय का वाटू लागले! मेल्यानंतर परलोक आहे; जे दुष्ट, हिंदु धर्माचा त्याग करून परधर्म स्वीकारतात; ते स्वतः नव्हे; तर आपल्या पूर्वजांसह नरकात जाऊन पडतात हे जर खरे असेल (एकदम अंधःकार होऊन)

पहिले भूत : (प्रवेश करून) ते खरे आहे! अक्षरशः खरे आहे. शंकर, तू हिंदु धर्माचा त्याग केल्यासरशी यमसभेत, हे पहा मला ओढून नेत आहेत!

शंकर : कोण तू! अरे, हे काय! मी झोपेत तर नाही ना! बोल कोण तू?

पहिले भूत : तुझी आई! शंकर, हे पहा माझ्या अंगातील रक्त, हे हिंदु रक्त आहे! हे पहा, त्याच रक्ताच झालेले हे माझ्या स्तनातील दूध, हे हिंदु दूध आहे! शंकर, तू माझ्या उदरात जन्मापूर्वी,आणि माझ्या अंगावर जन्म घेतल्यानंतर, हे हिंदु रक्त आणि हिंदु स्तन्य पिऊन वाढलास! तुझ्या शरीरातील अणुरेणु हिंदु हाडाचा आणि हिंदु मासांचा, हिंदु मज्जांचा आणि हिंदु बीजाचा आहे. शंकर, तू हिंदु आहेस. माझ्या पोटी येऊन मला तुझ्या पापासाठी नरकात ढकलू नकोस!

शंकर : आई, क्षमा कर!

दुसरे भूत : नाही, क्षमा नाही करणार! दुष्टा, माझ्या कुलाला कलंक लावलास! वर बघ, मी कोण आहे!

शंकर : बाबा! हे पृथ्वी, दुभंग हो आणि माझे लाजेल काळे ठिक्कर झालेले हे तोंड, मला बाबांपासून लपविण्यास जागा दे!

दुसरे भूत : तिथे पाताळात देखील तुला लपता येणार नाही. यमदूत तिथे देखील, आपला परमपूज्य हिंदु धर्म त्यागिल्याच्या महान् पापासाठी, तुझा पाठलाग करतील! मी तुझा पिता! आत्ता मला बाबा म्हणालास, पण मी महार होतो; मी हिंदु महार होतो. मग मला बाबा कसा म्हणतोस! तुला महार जातीची लाज वाटते ना! माझ्यासारख्या महार बापाच्या पोटी जन्माला आल्याची लाज झाकण्यासाठी, तू तुझ्या हिंदु बापाला, बाप न म्हणता, मुसलमानाला बाप केलास नाही का? मग त्याला बाबा म्हण, आणि आपल्या खऱ्या बापाला नरकात ढकल.

शंकर : बाबा! शंकरचे तुम्ही बाबाच आहा. ज्या नीचाने मुसलामान बाप केला त्या शिकंदराचा सूड मी लवकरच घेईन. बाबा तुमचा शंकर, त्या त्यांच्यात चोरासारख्या प्रविष्ट झालेल्या शिकंदराला लवकरच ठार मारणार आहे! आपण स्वस्थ असावे!

तिसरे भूत : शंकर! मी तुझा आजा!

चवथ भूत : शंकर! मी तुझा पणजा!

शंकर : आता माझे हृदय भयाने, आदराने, आश्चर्यांने, पश्चात्तापाने- अरे बाप रे फाटून जाणार! अरे बाप रे!

सर्व भुते : मुसलमानाला बाप म्हण! किरिस्तावाला बाप म्हण! आम्ही हिंदु, आम्ही हिंदु महार, आमची तुला लाज वाटते ना! दुष्टा, कुलकलंका-! हिंदु धर्मात आमच्या कुटुंबात जन्म घेऊन आम्हाला नरकात ढकललेस की! अजून तरी आमची या यमदूतांच्या हातून सुटका कर! अजून वेळ आहे!

शंकर : माझ्या अंगातील सर्व शक्तीनो, आता एकत्र व्हा, आणि जिव्हे, कापू नकोस! हे माझ्या पूर्वजांनो! मी काय केले असता हिंदुधर्मत्यागाच्या घोर पातकाचे क्षालन करून मी तुमच्या आत्म्याला शांतता देऊ शकेन? मी काय करू?

सर्व भुते : पश्चात्ताप !

शंकर : पण पश्चात्तापाने पतित झालेला हिंदुधर्मात प्रविष्ट होऊ शकत नाही असे म्हणतात ना?

सर्व भुते : ते असत्य आहे! जनाने - सामान्य लोकांनी जरी, हिंदुधर्म भ्रष्टाला शुद्धि नाही म्हणून म्हटले तरी, कठोरातील कठोर असा यमधर्मही, पश्चात्तापाने - भ्रष्ट पुनः सुष्ट होऊ शकतो- पतित - हिंदुधर्मात परत येऊ शकतो. असे मानतो! तर पश्चात्तप्त हो आणि-

शंकर : सांगा सांगा, आणखी कोणचा संस्कार करू; कड्यावरून कडेलोट करून घेऊन म्हणाल तर मरतो, पण मला पुनरपि हिंदु करून घ्या.

सर्व भुते : पश्चात्तापाने तू हिंदु झाला आहेसच. पण तुझे विशिष्ट कर्तव्य म्हणून सांगतो की, तुझ्या मूर्ख लंपटतेचा परिणाम, तिकडे सती कमलिनीला भोगावा लागते आहे- जा! तिकडे जा; तिच्या आणि तिच्या मुसलमानी छळाच्या मध्ये ढाल हो जा; हिंदुकन्यकांवर बलात्कार करू पाहणाऱ्या दुष्ट दैत्यांतील, निदान एका तरी दैत्याला वधदंड देऊन, मग तू तुझ्या हृदयातील रक्ताने कमलिनीचे पाय धू; म्हणजे आम्ही तुझे सर्व पितर पुन्हा सुखी होऊ ; हेच तुझे प्रायश्चित्तविधान! जा!

शंकर : चाललोच! चाललोच! (सर्व भुते जातात) मी शंकर आहे, मी हिंदु आहे. हे माझ्यातील मुसलमान झालेल्या शिकंदरा! चल, रणांगणात उतर! कमलेच्या समोर तुझा वध करून, तुझ्या हातून मला आणि माझ्या कमलेला आत्ता सोडवतो -चल, काय म्हणतोस! माझ्या देहाच्या घरातील सर्व प्रदेश, तू शंकराला मोकळा करून दिलाच आहेस! आणि तू आलास तसाच निघून जातोस; छट नीचा तसा नाही तुला पळू देणार. शिकंदरा, तुझा मी कमलेसमोर वध करणार; चल आता असा, पळशील कसा; चल!

(स्वतःच स्वतःला ढकलीत ढकलीत जातो.) (पडदा पडतो)

प्रवेश ५ वा

(स्थळ-गंगाजीची माडी. पात्रे - गंगाजी, कमलिनी)

गंगाजी : बाळे कमलिनी; संकटे चारी बाजूंनी मी, मी म्हणत आपणांवर येत आहेत; तुझ्या प्रेमाने वेडावलेल्या, त्या इब्राहिमादिकांच्या चांडाळ चौकडीला तर मी तोंडघशी पाडले. परंतु हा तुझा शंकर, हा बाट्या शिकंदर, ह्याने सुभेदार बंगषाला तुझा पत्ता दिला, आणि सुभेदाराची पापी दृष्टि तुझ्यावर पडली. तो त्या शिकंदराला बाजूला सारून तुला धरून नेण्यासाठी, आता कोणच्या क्षणी येईल याचा नेम नाही. कमलिनी आता जे काही साहस करायचे, ते आता याक्षणी केले पाहिजे. बाळे तुझा निश्चय तर स्थिर आहे ना?

कमलिनी : ताई, स्थिर आहे. कोणाही अहिंदूला मी होऊन स्पर्श करणार नाही. बलात्काराने कोणाही अहिंदूने माझी विटंबना केली, तर मी त्याचा सूड उगवायला सोडणार नाही. ताई मी चोख्यामेळ्याची शिष्यीण आहे, जानू महाराची मुलगी आहे. हिंदुधर्माच्या वेशीवर पहारा देण्याचे काम, आम्हा महारांकडे सोपवलेले असते. मी वेसकराची मुलगी आहे. मी हिंदुत्वाच्या वेशीच रक्षण करीत मरेन. पण धर्मशत्रूंना आत घेण्याला, माझा हात तरी उपयोगी पडू देणार नाही. पण ताई, माझ्यासाठी तुला केवढा त्रास झाला; तुझ्या सुखात मी माती कालवली की ग!

गंगाजी : कमल, तुझ्यासारखा देवतेच्या स्पर्शाने पावन झालेली ही गंगाजी - ही वेश्या या तुझ्या प्रतिज्ञेच्या सिद्धिस्तव काय करू धजते, ते आता पहा; तुझ्यासाठी नव्हे माझ्यासाठी; आजपर्यंत जी पापाची घाण माझ्या हृदयावर साचत आली, ती सर्व कोणत्या तरी महत्कृत्याच्या स्फोटासरशी, माझ्या रक्ताचे पाट फोडून मी धुवून काढणार. कमल, बघ ही स्फूर्ति, माझ्या अबलेच्या कोमल देहाला क्षणभर कंपित करून कशी लगेच लोखंडासारखी कणखर आणि निष्कंप करीत आहे बघ; आता माझ्या जिवाचे काहीही होवो; मी माझे सर्व द्रव्य माझ्या एका विश्वासू नोकरणीसह, माझ्या मावशीच्या घरी धाडून दिले आहे ते तुला तुझ्या आयुष्यभर पुरेल. तू येथून नीघ, पण संत चोख्याकडे जाऊ नकोस; त्याच्यावरही भयंकर किटाळ आले आहे. तर तू, नदीवर मी तुला दाखविलेल्या झोपडीत बैस. मी तुझी पाठ राखण्यासाठी इथेच किंचित् वेळ उभी राहते. ते इतक्यात आलेच तर मला पाहून, तू इथेच आहेस असे समजतील आणि मी बोलाबोलात वेळ काढीन. नंतर माझे काय होणे ते होवो, सुखरूप राहिले तर मागेमागे येऊन तुला झोपडीत भेटतेच. तेथून आपण माझ्या मावशीचे गांवी निघून जाऊ.

www.savarkarsmarak.com

कमलिनी : ताई, मी एकटीचे जाऊ?

गंगाजी : थांब! तुला एक सोबत देते. (एक कट्यार काढून) ही बघ ही तुझी निर्वाणीची मैत्रिण-

पद

जिवाची सोबत तुज ही आजि घे । कठिण संकटा माजि गे ।। ध्रु.

पोचविल तुझ्या धरासि ती पाही । न तरि घरा त्या देवाच्याही ।। १

कमलिनी : ठीक! ताई! या मैत्रिणीला पाहताच, मला किती धीर आला आहे म्हणून सांगू- मोठी पाणीदार पोर आहे! अगदी जशी माझी चंपी! तिच्यासारखी माझ्या कशी अगदी मुठीत वागू लागली आहे!

(पडद्यात खडाखड आवाज होतात.)

गंगाजी : कमल, कमल! मला वाटते ते आलेच असावेत. जा, लाडके, जा देव तुझा सांभाळ करो. मागच्या दाराने पार हो!

कमलिनी : घाबरू नकोस, ही मी निघालेच, पहा (परतून) तू मात्र -तुला मात्र केवढा त्रास झाला! ताई, माझा एक मुका घेतेस का!

गंगाजी : (मुका घेते) छे, छे बाळे, माझ्या कमल, ही अश्रु गाळण्याची वेळ नाही! माझे कमलच ते!

कमलिनी : पण आता वज्राहून कठोर! ताई, माझ्या नयनांत होते नव्हते तेवढे अश्रु तुझ्या हृदयावर गाळून टाकले नाही तर ते माझा मार्ग मला स्पष्ट दिसू देते ना! आता डोळे सुकले; आता त्यांच्यातून गळेल, तर केवळ रक्त गळेल, अश्रु नाही! येते ताई- (जाते.)

गंगाजी : जा! मुली! जा! (पडद्यात पुनः आणखी आवाज) (अगदी जवळ जवळ होते असलेले आवाज ऐकून) दार लावून टाकते पुढेच. देवा, आता या माझ्या निर्धाराच्या दाराचा अडसरे तूच हो!

पद

करुणाकर देवाजी करि करुणेसी आजि ।। ध्रु.

पतितांच्या निर्धारा आधारचि द्यावा जी ।। १

(पडदा पडतो.)

अंक ५ वा

प्रवेश १ला

(स्थळ - सत्यागारापुढील मार्ग)

कमलिनी : अगबाई! आता काही एक शंका उरली नाही. ताईच्या घरातून मी गुप्तपणे पळताना, त्यांनी मला दुरून पाहयल असावे निश्चित; आता कुठे जाऊ? हया मार्गाच्या आगे मागे त्यांची कुजबूज आणि दौडादौड ऐकू येत आहे. आता मध्येच कुणाच्या घरात शिरून लपता आले, तरच बचाव, नाही तर हे व्याध्याच वर्तुळे आंकुचित होते होते, मला लवकरच भिडणार. पण मला महाराच्या मुलीला कोण आपले दार उघडणार! उलट, माझी जातगोत ओळखली गेली, तर नसती आरडाओरड होऊन, माझा घात माझे हिंदु बांधवच करतील. हे पुढे सत्यागार तेवढे आहे. मी ऐकले होते की, हा सत्यभीरू सत्यवान् अस्पृश्यता मानीत नाही; तेव्हा आता त्यालाच शरण रिघाव. एक दोन घटका जर हा इथे मला लपू देईल, तर हे शत्रु सहजच मी आडगल्लीत निसटले असे समजून इतरत्र पाठलाग करीत निघून जातील. ठोठावतेच दार. आता हा सत्यवान् मला तारो अथवा मारो. (दार ठोठावते. सत्यवान् येतो.)

कमलिनी : महाराज?

सत्यवान : खोटे बोलतेस! मी राजा नाही, मला आचार्य म्हण. तुझे नाव काय?

कमलिनी : कमलिनी.

सत्यवान् : पुनः खोटे बोललीस! मनुष्य असूनही कमलिनी म्हणजे एक झाड आहे म्हणून मला फसवितेस!

कमलिनी : मला मनुष्य म्हणा, काय पाहिजे ते म्हणा, पण आता माझा जीव वाचवा! मी एका हिंदु महाराची मुलगी आहे. मला बलात्काराने धरून पळवून नेण्यासाठी, काही मुसलमानी गुंड माझ्यामागे लागले आहेत. आपण हिंदु आहात. मी दुसरे काही मागत नाही; आपण ही वावटळे निघून जाईतो मला सत्यागारात राहू द्यावे!

सत्यवान् : सत्यागारात, जो सत्य बोलतो तोच राहू शकतो.

कमलिनी : मी तर सत्यासाठीच या संकटात पडले आहे. कशी, ते मग निवेदीन.

सत्यवान् : होय का! ये आत. परंतु तू मघा, महाराची मुलगी आहेस म्हणून म्हणालीस, ते खोटे बोललीस. महारांच्या स्त्रियांशी तदितर पुरुषांचे आणि तदितर स्त्रियांशी महारपुरुषांचे गुप्त गांधर्व संबंध अनेकदा घडतात. अनुलोम आणि प्रतिलोम संबंध जेथे रूढ आहेत, त्या जगात कोण कोणाचा हे सांगता येणे कठीण आहे. म्हणून तू महाराची मुलगी, असे सांगणे खोटे असू शकेल. तू केवळ मी मुलगी आहे इतके म्हण, की घेतो आत!

कमलिनी : मी एक मुलगी आहे.

सत्यवान् : ये आत. (मोठ्याने) ठैंग्य, अरे ठैंग्य, काय करीत आहेस?

ठैंग्य : (प्रवेशून) पळी पंचपात्री घाशीत आहे, आचार्य!

सत्यवान् : खोटे बोलतेस! मूर्खा, जी वस्तू नेहमी ठेवावी तिथे स्थिरपण उभीच्या उभी राहते आणि जन्मांतरी कधी पळून जात नाही, तिला पळी म्हणतोस आणि प्रत्यक्षपणे जे एकच पात्र दिसत आहे, त्याला पंचपात्री म्हणतोस? अशा असत्याने वाणी विटाळून घेऊन, मग तू संध्येला बसणार? सुधार ती चूक आधी आणि नंतर ने या मुलीला. ती दमली आहे, बसू द्या तिला स्वस्थ. सत्यासाठी ती संकटात सापडली आहे.

(जातो. पाठोपाठ ठैंग्य व कमलिनी जातात.)

प्रवेश २ रा

(स्थळ : सत्यागारापुढील मार्ग; बंगषखान शिपायांसह येतो.)

बंगष : क्या उल्लू हय तुम लोग! अभी वो परी, रास्तेसे निकल गयी थी. फेर पकडी कैसी गयी नही?

पहिला शिपाई : गुन्हा माफ! परंतु ती या आडव्या गल्लीत पुढेच्या सडकेकडे पळून गेली असावी. तिकडे लोक तो रस्ताही रोखून उभे आहेतच!

बंगष : मध्येच तिला कोणी घरात नेऊन छपविली तर नाही? कोणी हिंदूने तिला, 'हिंदु' म्हणून घरात छपवून, रक्षण करण्याचा प्रयत्न केला असावा.

दुसरा शिपाई : अजी सुभेदारसाहेब! ती महाराची पोर. तिला 'हिंदु' म्हणून घरात घेण्याइतके, हिंदु लोक स्वजातीचे अभिमानी ज्या दिवशी होतील, त्या दिवशी हिंदुस्थानात इस्लामी प्रचाराची आशा नष्ट झाली, असे समजावे! ज्यांनी चोखामेळ्याला, देऊळे बाटवतो म्हणून, ठार मारण्यासाठी मुसलमानांच्या हाती दिले, ते हिंदु लोक का त्या महाराच्या मुलीच्या 'हिंदु' म्हणून, मुसलमानांच्या हातातून वाचविण्यासाठी, घरात घेणार? तिला ते मुसलमानांच्या घरात घालतील पण हिंदूच्या घरात घेणार नाहीत!

पहिला शिपाई : परंतु, सुभेदारजी, या सत्यागाराचा जो सत्वेडा मात्र, अस्पृश्यता मानीत नाही म्हणतात! तेव्हा न जाणो, त्याने तिला आत घेतली असावी. इतक्यात इकडे होती!

बंगष : फेर देखते क्या? घुसो अंदर, मारो बदमाषको!

पहिला शिपाई : नही साब! घुसने मारनेकी क्या जरूरत! हा सत्वेडा गवार है. तो आपण होऊन सर्व सांगेल; कारण तो जितका सत्यवादी आहे, तितकाच भ्याड आहे. त्याचे शिष्य त्याच्याच माळेचे मणी! (शिपाई दरवाजा ठोठावतात. सत्यागारातून ठैंग्य बाहेर येतो.)

पहिला शिपाई : क्यारे शिष्य! तुमच्या आश्रमात आता एक मुलगी आली आहे तिला बोलाव. तिचा भाऊ तिला भेटायला आला आहे. सुभेदाराचा हुकूम आहे. बोलाव तिला!

ठैंग्य : आत नसलेल्या माणसाला, सुभेदारसाहेबांचाच काय पण देवाचा हुकूम असला तरी, बाहेर कोण बोलावणारे? आत मुलगी कुणी आली नाही. आम्ही सत्यवानाचे शिष्य, खोटे कधी बोलत नाही, म्हणून मी होऊन इतके सांगतो की, एक मुलगी मध्यम आकाराची, जिचे डोळे विकसित, काळेभोर आणि घाबरलेले आहेत अशी-

बंगष : वो ही वो ही मेरी प्यारी, किधर है बतलावे!

ठेंग्य : काही वेळापूर्वी या बोळातून पळून, त्या पलीकडच्या सडकेकडे गेलेली मी पाहिली होती. खरे असेल ते आपण होऊन सांगावे, असा आमच्या गुरूचा उपदेश आहे.

बंगष : अच्छा बेटा. तेरा और तेरा गुरूका ईश्वर भला करे. दौडो शिपाई वही सडकपर चलो. या गल्लीच्या टोकाशी एक दोन रखवाले ठेवून सगळे तिकडचे मार्ग रोखा चला, गुपचुप!

(सगळे जातात नि सत्यवान् प्रवेश करतो.)

सत्यवान् : ठेंग्य, काय गडबड झाली? कोण आत्ता तुझ्याशी बोलत होते?

ठेंग्य : कमलिनील आत्ताच ज्यांच्या नीच वर्तनाची कहाणी सांगितली, ते पापी, सुभेदार बंगषसह, इथे आले होते, आणि मला विचारू लागले की, कमलिनी इथे आहे का? मी सांगितले ती पळून पुढे गेली म्हणून? तेव्हा ते लटांबर भलतीकडेच निघून गेले. आता काही तासांनी सर्व सामसूम होताच कमलिनीला गुपचूप बाहेर काढून देऊ!

सत्यवान् : गुपचूप! अरे मूर्खा! सत्यागारात गुपचूप! राजकोप किती भयंकर असतो, माहीत नाही तुला! जर का आम्ही तिला लपवून ठेवली म्हणून कळले, आणि ते तुझे गुपचूप सहसा उघडकीला आले, तर माझ्या शरीराचे तुकडे करून टाकतील तुकडे! जा, सांग जा त्यांना, ती मुलगी इथंच आहे. आम्ही अजाणपणाने तिला आत ठेवली. जा, सत्यागारात गुपचूप बसत नाही. सत्य बोल!

ठेंग्य : मी सत्य तेच सांगितले आहे. कमलिनी इथे आहे असे सांगितले असते तर तेच या परिस्थितीत असत्य झाले असते!

सत्यवान् : गाढव कुठला; गुरूला शिकवतोस; कसली परिस्थिति?

ठेंग्य : महाभारतकारांनी परिस्थितीची मर्यादा-

सत्यवान् : पुन्हा महाभारत; ज्या महाभारतात श्रीकृष्णाला देखील पुरुषपुंगव, म्हणजे पुरुषांतला बैल म्हणून म्हटले, ते खोट्या भाकडकथांनी भरलेले महाभारत? जा, आता जा, आणि ती मुलगी इथे आहे असे सांग जा!

ठेंग्य : मी जात नाही. आजपर्यंत आपले ऐकले! एक निष्पाप हिंदु कुमारिका जिवाच्या भयाने नव्हे, तर केवळ आपल्या हिंदुत्वरक्षणासाठी, मला एका हिंदूला माझा धर्म, मुसलमानी गुंडांच्या बलात्कारापासून

वाचीव म्हणून विनवीत असता, तिला- माझ्या धर्मभगिनीला त्या निधर्मी दुराचाऱ्याच्या जबड्यांत ढकलणार पापी सत्य मी बोलू? गाय कसायाच्या हातात सदक्षिणा देऊ? मी हे दुष्ट कृत्य साफ करणार नाही!

सत्यवान् : बंड; माझ्या शिष्यांनी माझ्याविरुद्ध बंड पुकारले!

ठेंग्य : ओरडू नका, तुम्हीच हिंदुधर्माविरूद्ध बंड उभारीत आहा!

सत्यवान् : हिंदु धर्म! कोणचा धर्म! सत्य हाच एक धर्म आहे! आणि मी सत्य तेच सांगणार? अहो शिपाईबुवा! अहो सुभेदार, ती मुलगी इथे आहे. (ओरडतो. कमलिनी येते.)

कमलिनी : आचार्य; हात जोडते, आता माझा आणखी छळ करू नका. मी अबला, बालिका, निरपराध. अस्पृश्यतेच्या आगीत आधीच होरपळून निघालेले हे जीवित, आता सत्याच्या जळजळीत फुफाट्यांत खुपसू नका! धर्माच्या नावाने तुम्ही सज्जनांनी माझा आजवर छळ केला. आता सत्याच्या नावाने माझा वध तरी करू नका. ही वावटळे जाताच सकाळचे आत निघून जाते. तोवर मला लपू द्या!

सत्यवान् : लपणे! असत्य! तुझ्या दीड दमडीच्या जिवाच्या भयासाठी मी सत्याचा त्याग करू की काय!

कमलिनी : जिवाचे भय? जीवनातील सुख अजून जिने पुरत चाखले देखील नाही, त्या मला अबोध कन्यकेला वाटतेच आहे. पण मी इतकी गयावया जी करते ती केवळ जीवनाच्या भयाकरिता करीत नसून, जीवनाहूनहि प्रिय असणाऱ्या, माझ्या नि आपल्या हिंदुधर्माच्या रक्षणाकरिता करीत आहे. माझीच परीक्षा पहाणे असेल, तर ही घ्या सुरी आणि स्वतः खुपसा माझ्या हृदयात! पण आचार्य, त्या म्लेंच्छ कसायांच्या पापी लालसेला मला विकू नका. बोलावून आणून, ही त्यांच्या तावडीतून सुटलेली गाय, त्यांच्या सुऱ्यांपुढे ढकलूं नका; दया करा; 'दया धर्म का मूल है'

सत्यवान् : काय भकतेस! 'दया धर्म!' 'न हि सत्यात्परो धर्मः नानृतात्पातके परं' शिपाई धावा.

ठेंग्य : हे निर्दय पुरुषा! विजयनगरच्या हिंदु साम्राज्याची गुप्त बातमी जे नराधम शत्रूला कळवीत होते, ते सत्यच बोलत होते. तुझी ही सत्याची व्याख्या खरी ठरली; तर, जो जो देशद्रोही विश्वासघातकी असेल, त्याची त्याची आत्तांचे आत्ता नरकातून स्वर्गाकडे बढती केली पाहिजे. हे पहा, तुम्ही असत्य बोलूं नका, पण निदान चूप रहा. मी असत्य बोललो आहे ना, मी नरकात पडेन! हया निरपराध कन्यकेचा जीव वाचेल, धर्माचा पक्ष राखला जाईल; अन्यायाचा हेतु निष्फळे केला जाईल. ज्यायोगे इतके धर्मकार्य

साधत, त्यासाठी मी एकटा आनंदाने नरकात जाईन. केवळ चूप रहा म्हणजे ते परतून येणार नाहीत आणि भिण्याचे कारण उरणार नाही!

सत्यवान् : अरे भयासाठी मी हे म्हणतो की काय?

ठैंग्य : नाही तर काय? ढोंगी मनुष्या, तुझ्या अंतःकरणातील राजकोपाचे भय, मघा तुझ्याच तोंडांच्या बिळातून डोकावून गेले आहे. तुझ्या देहाचे, कमलिनी लपविली म्हणून क्वचित् तुकडे तुकडे होतील, म्हणून ते सत्याचे अवडंबर रचतो आहेस.

सत्यवान् : गुरूचा उपमर्द! अहो शिपाईबुवा, धावा, ती मुलगी इथे- (ओरडतो.)

कमलिनी : साधो! देवा! मनुष्या! ज्या हातांनी आजन्म कोणाचाही घातपात केला नाही; ते हया कुमारिकेचे निष्पाप हात तुझ्या पायाला विळखा घालीत आहेत.

केवी दीन गायिसि द्याया । सदक्षिणा त्या दुष्ट कसाया ।। ध्रु.

ज्या पाया मीं पडते बाला । लाथाडा त्या पायिच सोडुनि माया ।। १

माझा विश्वासघात करू नकोस; माझ्या धर्मा, तूच त्राता आहेस. थोडा चूप रहा.

सत्यवान् : (तिला ढकलून) चूप राहणें-म्हणजे सत्य छपवणे- म्हणजे असत्य! अहो सुभेदार- (ठैंग्य हाताने त्याचे तोंड दाबतो. तो मधून ओरडतो तोच शिपाई येतात.)

शिपाई : काय आरडाओरड आहे?

सत्यवान् : शिपाईबुवा, ही पहा ती पोर, जिला धरायला तुम्ही धावपळे करीत आहात, ही माझ्या आश्रमांत नको नको म्हणता घुसते आहे. हया माझ्या शिष्याने, ती आत असता जाणूनबुजून खोटे सांगितले. बोलवा सुभेदाराला- मी मात्र सत्य बोललो हो! (एक शिपाई शिटी वाजवितो, सुभेदार वगैरे येतात.)

शिपाई : सुभेदारजी, ती सुंदरी सांपडली. ती पहा त्या कोपऱ्यात खळी आलेल्या गोंड्यासारखी उभी आहे. सत्यवानाने खरे आपण होऊन सांगितले. ठैंग्याने आम्हाला फसवले!

सुभेदार : अच्छा, पहिले ठैंग्य को बांधो! सत्यवानको अवश्य कुछ बक्षिस देना चाहिये!

पहिला शिपाई : नही साहेब; तो भी तो काफर है ना! मारो इसको भी!

बंगष : चुकतोस. सत्याच्या नावाने विश्वासघात, अहिंसेच्या नावाने पौरुषघात, आणि भूतदयेच्या नावाने आत्मघात करणारे सज्जन, हिंदु लोकात जिवंत आहेत; म्हणूनच तर त्या राष्ट्रावर, नांगी नसलेल्या किड्यावर आपण नाचतो; तसे आम्ही नाचू शकत आहो. सत्यवानासच नव्हे; तर त्याच्या ह्या उपयुक्त पंथाच्या संस्थेलाही साह्य पोचवा!

सत्यवान् : सत्याची चाड सुभेदारांना इतकी आहे हे पाहून मला आनंद होतो. माझी अशी विनंती आहे की, आपणहून ह्या मुलीला इतःपर कोणताही त्रास पोचू नये. वा बलात्काराने-

सुभेदार : (संतापून) ह! फुगला लेकाचा; कोणावर बलात्कार करायचा आणि कोणावर नाही; हे तू नको शिकवायला आम्हाला; जर पुनः मध्ये तोंड घातलंस तर जीभ छाटून टाकीन!

सत्यवान् : नको, नको नको, मला सत्य बोलायला तेवढी राहू द्यावी.

शिपाई : चूप रे बेवकूफ (सत्यवानाला धक्का मारताच तो एका कोपऱ्यात जाऊन थरथर कापत उभा राहतो नि शिपाई त्याला धरतो.)

बंगष : आणि आता हे सुंदर कन्यके, तू मला सांग, की एखादी हरिणी व्याधाच्या वर्तुळात कापत उभी राहते, तशी तू इथे का उभी आहेस; मी काही तुझी मृगया करण्यासाठी, तुला बाण मारायला धनुष्य ओढून उभा नाही! उलट तुझ्या त्या भृकुटीच्या प्रत्यंचेपासून सुटणाऱ्या कटाक्षकरांनी विद्ध होऊन मी इथे उभा आहे. विचित्र हरिणा, तू व्याधाचीच मृगया केलीस!

कमलिनी : सुभेदार, माझे कटाक्षशर, ते असे दूर आहेत तोवर सोसावेच लागतील. ते शर जर सहन होते नसतील तर त्यांनी जवळ येऊन हरिणीच्या अंगावर एकदा अभयदानाचा सौम्य हात फिरवावा; म्हणजे तेच विभीत हरिण लडिवाळपणाने तो हात चाटू लागेल.

बंगष : अबके अब (जवळ जात) प्यारी, ये हिंदु लोगोंने तेरा बहुत छळ किया! त्या छळातून तुला सोडविण्यासाठी हा सुभेदार बंगष इथे आला आहे. हे कुरळ्या केसाचे, काळ्या भोर डोळ्याचे, छाती तटतटून वर आलेले कामोद्दीपक कुमारी, हे माझे समर्थ बाहू तुझ्या सालिंगन स्वागताला प्रसृत झालेले आहेत- ये!

ठैंग्य : (स्वगत) काय आश्चर्य! धर्मासाठी प्राण देईन म्हणून म्हणणारी हिंदु कुमारिका, त्या सुभेदाराला पाहताच एकाएकी भाळली तरी कशी! पहा! ती त्याला आलिंगन द्यायला, स्मिताची लाजरी आमंत्रणेही

देऊ लागली. किती झाले तरी महाराची पोर! जातीवर जायचीच! धिक्कार असो स्त्रियांच्या कामलंपट चंचलतेला! !

कमलिनी : (सस्मित) सालिंगन स्वागतासाठी प्रसृत झालेल्या सुभेदारांच्या बाहूंना, त्यांचे पाय मात्र मागे घेत आहेत असे वाटते!

बंगष : सौंदर्याच्या फुला! तुला हुंगायला पैगंबराचे पाय देखील, पुढे पडल्यावाचून राहणार नाहीत! घे हे सालिंगन स्वागत (आलिंगन द्यावेयास जातो तोच कमलिनी अकस्मात् त्याचे पोटात कट्यार खुपसते व कर्कश आवाजाने)

कमलिनी : आणि घे हे त्याचे फळ!

ठैंग्य : हरहर महादेव! हरहर महादेव! महाराच्या कन्यकेने धर्मवीरत्वात चितोडच्या राजकन्येला लाजवले! हरहर महादेव!

बंगष : या अल्ला! मारा! लडकीने मेरा खून किया! (खाली पडतो.)

कमलिनी : (ती रक्ताने भरलेली कट्यार वर परजून) हा पाहिलास! हिंदु तरुणीच्या सौंदर्याच्या फुलाचा काटा! हिंदु कुमारिकांनो, ही रक्ताल माखलेली कट्यार पहा! पावित्र्यरक्षण आणि धर्मसंगोपन, आमच्या पुरुषांना आणि देवालाही जेव्हा करिता येत नाही, तेव्हा ते एकतर चितोडची चिता करू शकते; नाही तर ही सूडाची सुरी! त्या दोहोंत एक महत्वाचा फरक आहे. चितोडची चिता ही, दुष्टांसाठी सुष्टांचा बळी घेते. चोरांसाठी संन्याशाला फाशी देते. बलात्काराला वाव मिळू नये म्हणून अबलांचाच संहार करून टाकते. आगलाव्याला आपल्या घराला आग लावता येऊ नये म्हणून आपले घर आपणच जाळून टाकते. चितोडची चिता दुष्टाची निराशा करू शकते; पण त्याचे निर्दालन करू शकत नाही. परंतु सूडाची ही सुरी, ही क्रोधाची कट्यार ती दोन्ही कार्ये करू शकते. आपला देह वा धर्म बलात्काराने बाटविणाराला, आज नाही उद्या, रात्री नाही दिवसा, आधी वा मागून, उजेडात वा अंधारात, आक्रमात वा आलिंगनात, जागेपणी वा झोपेत, जिथे जशी संधि सापडेल तिथे, ही सात्विक क्रोधाची राजसी कट्यार गाठून, त्याला त्या पापाचा दंड दिल्यावाचून सोडीत नाही. म्हणून चितोडच्या चितेपेक्षा हया सूडाच्या सुरीला, बलात्कार थरथर कापत असतो. ही कट्यार एखाद्या कुमारिकेची शुद्धता क्वचित् संरक्षू शकणार नाही! परंतु त्या भ्रष्ट शुद्धतेचा सूड उगवल्यावाचून मात्र राहणार नाही. हया सूडाच्या प्रतापानेच इतर शेकडो कुमारिकांची शुद्धताही पण संरक्षण करील. कारण अशा अदृश्य कट्यारी धारण करणाऱ्या आकसबाज अंगनांना, आपल्या अंतःपुरात पाळायला, दुर्जन बलात्कार तसा दचकून राहील; की, जसा मनुष्य आपल्या अस्तनीत

विस्तव बाळगायला दचकत असतो! हरिण, हरिण म्हणून मेला माझी मृगया करू पहात होता नाही! मेल्या, हिंदुकन्यकांचे डोळे हरिणासारखे असतात; परंतु हे बघ त्यांचे नख! (कट्यार दाखवते) सिंहिणीच्या नखाहून अणकुचीदार, कठीण आणि क्रूर! माझा सूड, माझ्या धर्माचा सूड! ज्या कुमारिका हया अधमाने आजपर्यंत बाटविल्या असतील, त्यांचा सूड मी उगवला. आता दुसरा कोणचाही सुभेदार हिंदूच्या सौंदर्याची फुले खुडीत हिंदु उद्यानातून इतक्या निर्भय आणि निलर्ज्ज साहसाने फिरणार नाही! कारण त्या उद्यानात ही कट्यार नागिणीसारखी वावरत असते आणि केव्हा केव्हा कडकडून डसते, हे त्यांच्या प्रत्ययाला आले आहे. नसेल तर चाख पुनः हे तिचे विषारी पाणी! ! ! (धडपडणाऱ्या सुभेदाराला पुनः सुरीने भोसकते नि तो मरतो.)

पहिला शिपाई : ए शिपाई, तुम क्या देखता है? हमारे सामने सुभेदार मारा गया. पकडो ये लडकीको!

सर्व शिपाई : धरा, मारा! बलात्कारा!

सत्यवान् : धरा! वरवर प्रेम दाखवून हया चांडाळणीने, त्या सरळ सुभेदाराचा खून केला. ही थापेबाज, पापी, राक्षसीण आहे. तो सुभेदार आपले प्रेम खरे बोलून व्यक्त करीत होता, तो सत्यवक्ता होता. त्याची हिने हत्या केली. मला सोडा, हिला धरा. (दोन शिपाई कमलिनीवर चालून जातात तोच गंगाजी येते.)

गंगाजी : (सुभेदाराला मारलेले पाहून) धन्य आहे तुझी वीर बालिके! कमल, उगवलास तू आमचा सूड! आणि हा मी उगवते आता तुझा सूड! सोड मेल्या सोड तिला आणि सोड प्राण. (त्यातील एका शिपायाला घायाळ करते. कमला सुटते. पण गंगाजी घायाळ होऊन पडते.)

कमलिनी : (गंगाजीच्या छातीवर तोंड ठेवून रडू लागते) ताई, ताई!

उरलेला शिपायी : ए राक्षसिणी! आत्ताच कशी रडतेस! पहिल्याले थोडी हांस, नि मग रड. बटकी! ही एक बाजारबसवी मेली आहे, तिची गादी चालवायला तूच आता तिच्यावर बैस. आता तुला सोडवायला आणखी कोण येतो पाहू? (ओरडत तिची कट्यार हिसकू पाहतो. कमलिनी झटापट घेते तोच तलवार उपसून शंकर प्रवेश करितो.)

शंकर : हा बघ! तिला सोडवायला तुझा काळ येतो आहे. (शंकर एकाएकी तुटून पडतो नि त्या उरलेल्या शिपायास ठार करतो. पण कमलिनीहि कट्यार लागून, अग आई! असे ओरडून घायाळे पडते.) (गुडघे टेकून) कमल! कमलिनी! हे देवी?

कमलिनी : (दचकून) शिकंदर! हे मनुष्या! तुला जर थोडीतरी माणुसकी असेल, तर आता तुझा अमंगल आवाज, माझ्या शेवटच्या श्वासाला स्पर्शवून मला विटाळवू नकोस?

शंकर : (कण्हत) कमल! मी शिकंदर नाही, शंकर आहे?

कमलिनी : (त्याला पाहून स्वगत) अहा रे माझ्या हृदया! लागलंस पुन्हा भुलायला या मोहक सर्पाला पाहून! आता मरतांना देऊ का याला याच चिरवांछित आलिंगन! (कठोर स्वरानं) पण कमले! याला म्हणजे कोणाला! शिकंदराला! नाही! (उघड) हे सुखकर शत्रो, हे पापी प्रियकरा, हे सुंदर सर्पा, ऐक! पूर्वी एकदा माझे तुझ्यावर प्रेम होते. त्या प्रेमाच्या आठवणीची शपथ घालून मी तुला सांगते की, तू मला मरतांना तरी सुखाने मरू दे! मला हिंदु कन्यकेला - तुझ्या बाटग्या हातांचा स्पर्श करू नकोस!

शंकर : त्याच प्रेमाची आठवणे देऊन मी तुला सांगतो की, तू जी त्या प्राजक्ताखाली शपथ घेतली होतीस की, यावज्जीवन तू मला तुझाच म्हणशील आणि मरतानाही माझ्याच आलिंगनांत मरशील! ती शपथ तू आता तरी पुरी कर. मला तू आपण होऊन एक आलिंगन दे; म्हणजे, मी सुखाने मरेन!

कमलिनी : खोटे बोलतोस! मी तुला माझा म्हणण्याची शपथ घेतली नव्हती! मी शपथ घेतली होती; पण ती शंकराच्या आलिंगनात मरण्याची घेतली होती?

शंकर : कमले, तोच हा तुझा शंकर आहे. माझ्यातला शिकंदर हा बघ या कट्यारीने ठार झाला! (कट्यार स्वतःला मारून घेतो. कण्हत) शंकर हिंदु होता, मीही हिंदु आहे, शंकर महार होता, मीही महार आहे. हे माझे रक्त अणुरेणु हिंदु रक्तच आहे बघ! हे देवी, मी पश्चात्तप्त! या माझ्या रक्ताने तुझे हे चरणकमल धुऊन, माझ्या पापाच प्रायश्चित्त घेतो. मला शुद्ध करून घे. माझा प्राण जाऊ पहात आहे. तो जाण्यापूर्वी-

कमलिनी : तर मग ये प्रियकरा! ये, एकटा जाऊं नकोस! माझी शपथ खरी करते; आणि तुझ्या प्राणांच्या सोबतीला हे प्राणही जाऊ देते. मरणाच्या मुहूर्तावर, आलिंगनाच्या मंडपात माझ्या शंकरशी मी प्रतिज्ञात केलेला विवाह लावला! हे देव हो! तो मंगलकारक होऊ द्या. (दोघे आलिंगून पडतात.)

शंकर : हे दयाळा देवा! हे गोड मरण मला जीवनाहून आनंददायक वाटते आहे!

कमलिनी : हो, आनंददायक! उभ्या आयुष्यात मला दोन क्षण आनंददायक गेले. एक, त्या प्राजक्ताच्या झाडाखाली तू माझे जेव्हा पहिल चुंबन घेतलंस तेव्हा; आणि दुसरा, हया आयुष्याच्या अंताच्या गाभाऱ्यात हे तुला दुसरे आणि शेवटचे लडिवाळे चुंबन देत असता!

शंकर : (चुंबन घेत) हे प्रभो! ज्या सृष्ट्युत्पादक महान् निःश्वासातून हे आमचे दोन श्वास आम्ही आज एकत्रित करून, त्याच निःश्वासात परत सोडीत आहोत! गोविंद! गोविंद! गोविंद!

(दोघेही नामे उच्चारीत एकत्र मरतात.)

प्रवेश ३ रा

(स्थळ - जंगल, जाफरअल्ली चोख्याला घेऊन येतो.)

जाफरअल्ली : चोखा, आता माझे सांगणे संपले. बोल अगदी थोडा वेळ आहे. हया भयंकर मरणापासून तुला वाचायचे असेल तर बोल, तू मुसलमान होतोस म्हणून! वेड्या, दगडाची मूर्ति देव विठोबा आहे असे तुला वाटते तरी कसे?

चोखा : कसली दगडाचि मूर्ति! अहो!

व्यापक व्यापिला तिही त्रिभुवनी । चारी वर्ण खाणी विठू माझा ।।

प्राण जेणे चळे मन जेणे बोळे । शून्याते वेगळे विठू माझा ।।

आकार जितुका तितुका तो नासे । निराकार असे विठू माझा ।।

चोखा म्हणे तोचि आनंदाचा कंद । नाव हे गोविंद मिरविले ।।

जाफरअल्ली : चोखा, बरे राहू दे ते तत्वज्ञान! तुझे मरण ज्या अस्पृश्यतेच्या कलंकाने क्षणोक्षणी जवळ येत आहे, तो अस्पृश्यतेचा कलंक तू मुसलमान होताच धुऊन निघेल, हे निर्विवाद आहे ना? मुसलमान सर्व मनुष्यांना समान मानतात. सर्व मनुष्ये एकाच देवाची, एकाच घरात, एकत्र प्रार्थना करितात.

चोखा : होय का? मग मी मनुष्यच आहे आणि परमेश्वराची मराठीत प्रार्थनाही करतो. मग मुसलमान होण्यात आणि अरबी प्रार्थनेत विशेष ते काय? देवाला अरबी समजत आणि मराठी समजत नाही असे थोडेच आहे!

जाफरअल्ली : विशेष काय? चोखा, जोवर कोणी मनुष्य मुसलमान होते नाही; तोवर तो काफर समजला जातो. काफराला कोणी कन्या देत नाही; काफराला समाजात स्थिति नाही; काफराला स्वर्गात गति नाही. नीचातला नीच मुसलमानही, साधूतील साधू काफरापेक्षा, खुदाला अधिक प्रिय आहे. काफराला तारा; अशी प्रार्थना करणेही पाप आहे. काफराला-

चोखा : पुरे झाले! मौलवी आपण केलेल्या त्रोटक वर्णनावरूनही, मुसलमान सर्व मनुष्यांना समान मानतात, म्हणजे काय करितात, हयाचा भयंकर अर्थ माझ्या ध्यानात आला. मुसलमान - मग तो कितीही नीच असला तरी ईश्वराचा लाडका लेक- आणि काफर, मग तो पापभीरू असला तरीही नरकाचे धन, हीच आपल्या मुसलमानी धर्मातील मनुष्यमात्राच्या समतेची व्याख्या ना? हयापेक्षा आपल्या

नारंभटाची अस्पृश्यतेची व्याख्या, किती तरी पटीने मायाळू आहे. नारंभट्टी अस्पृश्यता माणसेच मानतात. पण ही तुमची काफरी अस्पृश्यता देव देखील मानतो. कारण तो काफराला मेल्यानंतरही शिवत नाही, त्याला तारीत नाही. मग तो कितीही निष्पाप असो! नारंभट्टी अस्पृश्यता अमंगळ म्हणून आम्हा महारांच्या देहाला फार तर शिवणारे नाही, पण तुमची ही मुसलमानी वा किरिस्तावी अस्पृश्यता काफराच्या आत्म्याला शिवू नये म्हणून सांगणार! मूठभर मुसलमान वा किरिस्तांव सोडून, उभी मनुष्यजाति, तिच्या कोटि कोटि पूर्वीच्या पिढ्यांसह अक्षय नरकात पिचत राहणार. देवदूत, काफराला त्यांची इतर पापपुण्य न पाहता फरफटत नरकात नेऊन टाकणार असे मानणाऱ्या ह्या तुमच्या क्रूर आणि भयानक काफरी अस्पृश्यतेपेक्षा, हया एका लहानशा जन्मापुरतेच काय ते पतिताच्या देहाला शिवू नये, म्हणून मानणारी ही नारंभटी अस्पृश्यता, शेकडो पटीने सुसह्य आहे. कारण तीप्रमाणे अस्पृश्यांसही पुढील जन्मी सद्गति मिळू शकते, स्पृश्य आणि मुक्त होता येत. पण तुम्ही सांगता तसेच जर मुसलमानी दर्शन असेल तर त्यात काफराला पुनर्जन्म नाही, मुक्ति नाही, नरकावाचून गति नाही. ही तुलना मी केवळ नारंभटी अस्पृश्यतेशी केली. कारण हिंदूचा धर्म अस्पृश्यताच मानीत नाही. आणि हिंदूचा खरा देव तर, अस्पृश्यांच्या घरी येऊन त्याला पंक्तिपावनही करू शकतो. कारण म्या महाराल देखील-

अहो हेचि देही अहो हेचि डोळा । प्रत्यक्ष पाहिला पांडुरंग ।।

देही देखिली पंढरी । आत्मा अविनाशी हरि ।।

मुळींच नाही चोखामेळा । तेथे कशाचा विटाळ ।।

चोखा म्हणे मज हेचि वाटे गोड । आणिकाची चाड नाही! नाही ।।

जाफरअल्ली : अरे निदान हे तुझे भयंकर मरण टाळण्यासाठी तरी तू मुसलमान हो!

चोखा : मौलवीजी, आपले पैगंबरसाहेब सध्या कुठे असतात?

जाफरअल्ली : (स्वगत) याला पैगंबरविषयक जिज्ञासा वाटू लागली तर! बहुतेक हा द्रवत चालला! (उघड) अरे वेड्या, आमच्या पैगंबराविषयी पाहिलंस ना तुझे अज्ञान किती गाढ आहे ते! म्हणूनच तो दगडी देव तुला सर्वस्व वाटतो. ऐक, आमचे पैगंबर आपल्या हजारो अनुयायांसमक्ष मदिनेस शेकडो वर्षांपूर्वीच देह ठेवते झाले.

चोखा : होय ना! तर मग मौलवीजी, जो मुसलमानी धर्म त्याच्या प्रत्यक्ष संस्थापक पैगंबराचे मरण टाळू शकला नाही, तो मुसलमानी धर्म माझ्यासारख्या एका नवागत पतिताच मरण टाळील, हे संभवत तरी कसे?

जाफरअल्ली : मर, मर, दुष्टा तर, तू असाच हाल हाल करून घेत मर. (पडदा उघडतो) इब्राहिम, लोक हो, हा घ्या चोखा, मी तुमच्या हाती दिला आहे. चांगला ठेच ठेचून याला ठार करा! जोडा बैल, आणा शिळवटा आणि बांधा याला जोखडाला! (इब्राहिम, नारंभट, भिकूशेट इत्यादि लोकांसहित चोख्याला ओढीत आणतात आणि शिळवट्याला बांधू लागतात.)

सोयरा : (प्रवेश करिते) अगबाई, अहो मी पाया पडते! नका असे माझ्या त्या निरुपद्रवी नाथाला छळू! देवा! देवा!

अभंग

घाई घाई आता विठू चालू नको मंद

मारिताती लोक वदती केला अपराध ।।

विठोबाचा हार तुझ्या कंठि कैसा आला ।

शिव्या देती,मारा म्हणती, देव बाटवीला!

तुमचे दारींचा कुत्रा नका मोकलूं दातारा ।

अहो चक्रपाणी तुम्ही आम्हा जिमेदारा ।।

जाफरअल्ली : चोखा बघ, अजून मघा मी म्हटले ते ऐक,

चोखा : अभंग - (भैरवी)

माझा मी तो सर्व निवेदिला भाव । धरोनी एक ठाव राहिलोसे ।।

जेथे काळाचाही पुरेचि न हात । त्याचे पायीं चित्त समर्पिले ।।

भय नाही चिंता कोणता प्रकार । झालोंसे निर्भर नामबळें ।।

चोखा म्हणे आता आता लागलासे झरा । विठोबा दातारा याची नामे ।।

(भजन करितो.)

जाफरअल्ली : मर तर ! हुसका ते बैल!

सर्व लोक : हुसका बैलांना, मारा चाबूक! (बैलांना चाबूक मारतात.)

जाफरअल्ली : अरे हुसका बैल, अजून उभेच, आसूड मारा, चाबूक हाणा!

इब्राहिम : अरे हे काय! बैल का चालते नाहीत? मला असा थरकांप का सुटला! माझे मन मला असे खाऊ का लागले?

नारंभट : अरे बाप रे! ही भुई अशी का हादरू लागली?

(आकाशवाणी)

(मूर्खांनो, ऐका, नीट ऐका! संतरक्षणासाठी स्वतः श्रीकृष्ण आपल्या प्रबळ भुजांनी जोखडाला थोपवून, आड उभे आहेत. आता बैलांची काय कथा? प्रत्यक्ष यमदूत जरी ओढू लागले तरी तो शिळवटा हालणार नाही! शुद्धीवर या, नाहीतर भयंकर संकट कोसळेल!)

जाफरअल्ली : काय हे थोतांड! द्या तो चाबूक इकडे. बैल तर राहोतच, पण या चोख्यालाच मी आसुडाने मारतो. आता कुठे आहे तो काफरांचा हिंदु देव?

किसन : (मागून एकदम येतो व जाफरअल्लीला कट्यार मारून खाली पाडतो.) हा पहा तो हिंदूचा देव!

(श्रीकृष्ण प्रकट होतात.)

सर्वजण : अरे पळा! अरे पळा! भूकंप, विजा, कडकडाट! पळा!

(वैनायक वृत्त)

श्रीकृष्ण : हां! न एक पद पुढेती जाल कुणीही!

माझ्या प्रियभक्ताच्या अंत्यजांतल्या

छल जो हा केला तो, केवळ अहा

छळ त्याचा, परि अंत्यज जातिचा उभ्या

केलाती छळ असहृय आजवरी जो. ५

त्यांचे फळे घातके ना भोगता असे,

एकही न पद पुढेती जाल कुणीही!

ब्राहृमण हो, क्षत्रिय हो, वैश्य, शूद्र, हो

तुम्हि महारांसि महा नीच लेखिले

अस्पृश्य श्वानाहुनि, तेविची तुम्हा १०

पुत्रांसी, पौत्रींसी आणि प्रपौत्रां

तुमच्या त्या, हाय हाय, अखिल भूवरी

लेखितील जाति अन्य अन्य खंडिच्या,

द्वीपांतरिं, खंडांतरिं हिंदु पाहतां

रक्तपिती सम जग हुसकील तुम्हा ही! १५

हे महार तुमचे, त्यां हिणविता तुम्ही

जगताचेची महार व्हाल तुम्हीं जै,

धर्मबंधु छळ करिता तुमचिया अशा,

दुष्ट अहंतेचा तैं दंड तुम्हाला

लागेलचि द्यावा मोजूनि पै न पै. २०

सर्वजण : प्रभविष्णो, विष्णो, तू कृष्णकृपाला!

अपराधी हे पश्चात्तप्त आपुल्या

हृया भीषण शापे भयभीत होउनी

रिघताती चरणि शरण, यापुढे जशी

www.savarkarsmarak.com

आज्ञा देतील देव वर्तु तसेची २५

श्रीकृष्ण : ऐका तरि आज्ञा सुस्पष्ट आमुची!

यद्यपि कालांत अन्य बहु पुरातन,

रक्तबीज संस्कृतिच्या तीव्र विरोधे

हे अस्पृश्यत्व समाजासि हित असे

गमले सुज्ञांहि शास्त्रसिद्धसे, तरी ३०

तो आजी शास्त्रवाद मिटवि मी स्वये!

अस्पृश्यत्वासी यापुढेति समजणे

कलिवर्जी आर्यें ही स्पष्ट मदाज्ञा,

याविरुद्ध जे जे ते शास्त्र वर्ज्य की!

शब्द आमुचा तोची शास्त्र जगाचे! ३५

देवालय देवांचे, देव मी स्वये

आज द्वार उघडी ते अंत्यजांप्रति

सोसुनिया खळबळे छळ नित्य नवाची

ज्यांची ना पायरीहि स्पर्शु ये तया,

देवळांतल्या देवा देव मानुनी ४०

निवसत जे हीन कोटि कोटि हे

हिंदु जातिच्या ध्वजासि धरुनि राहिले

हिंदुधर्मदुर्गासी वेस रक्षुनी

त्या त्यांच्या भक्तीने तुष्ट होउनी

पाप शाप पूर्वीचे अंत्यजांप्रती ४५

करित मी क्षमा स्वयेचि; त्यांस देतसे

स्पृश्यांसम सर्वहि अधिकार ह्यापुढे!

हा नवे उ:शाप त्यांसि म्यां समर्पिला

हितकर तो, हिंदुजाति होइलचि तुला ४९

सर्वजण : अनुगृहीताः अनुगृहीताः अनुगृहीताः वयं ।

(भरत वाक्य)

पद (नाचाचे)

होईलचि भारत विजयी पुन्हा ।

कृष्ण कृपा तरि । ह्यासि संगरी ।। होई. ।। ध्रु.।।

साहस नवे नवे सिंहासन नवे ।। आशा मनीषा पराक्रम नाना।।

(समाप्त)

www.savarkarsmarak.com